॥ श्रीहरिः ॥ 1716▲

# भगवान कसे भेटतील?

[ ब्रह्मलीन परम श्रद्धेय श्रीजयदयालजी गोयन्दका यांच्या प्रवचनांवरुन संकलित ]

भगवान कैसे मिलें? (मराठी)




जयदयाल गोयन्दका

॥ श्रीहरिः ॥

# भगवान कसे भेटतील ?

[ ब्रह्मलीन परम श्रद्धेय श्रीजयदयालजी गोयन्दका यांच्या प्रवचनांवरुन संकलित ]

## भगवान कैसे मिलें ? ( मराठी )

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

गीताप्रेस, गोरखपुर

**पुस्तकें यहाँ भी उपलब्ध हैं—**

**गीताप्रेस, गोरखपुरकी पुस्तक-दूकान**

१-सूरत— 2016, वैभव एपार्टमेन्ट, भटार रोड, नूतन निवासके सामने © ( 0261 ) 2237362, 2238065
२-मुम्बई— 282, सामलदास गाँधी मार्ग ( प्रिन्सेस स्ट्रीट, मरीन लाईन्स स्टेशनके पास )
© ( 022 ) 22030717
३-नागपुर— श्रीजी कृपा कॉम्प्लेक्स, 851, न्यू इतवारी रोड © ( 0712 ) 2734354
४-जलगाँव— 7, भीमसिंह मार्केट, रेलवे स्टेशनके पास © ( 0257 ) 2226393, 2220320
५-औरंगाबाद— रेलवे स्टेशन, प्लेटफार्म नं० १
६-हैदराबाद—दूकान नं० 41, 4-4-1, दिलशाद प्लाजा, सुल्तान बाजार
© ( 040 ) 24758311, 66758311

सं० २०७५ छठा पुनर्मुद्रण १,५००
कुल मुद्रण २०,५००

❖ मूल्य—₹ १५
( पन्द्रह रुपये )

प्रकाशक एवं मुद्रक—

**गीताप्रेस, गोरखपुर—२७३००५**

**( गोबिन्दभवन-कार्यालय, कोलकाता का संस्थान )**

फोन : ( ०५५१ ) २३३४७२१, २३३१२५०, २३३१२५१

web : **gitapress.org** e-mail : **booksales@gitapress.org**

**गीताप्रेस प्रकाशन gitapressbookshop. in से online खरीदें।**

॥ श्रीहरि: ॥

# विषय-सूची





# निवेदन

मनुष्य जन्माचा एक मात्र उद्‌देश्य भगवत्प्राप्ती हाच आहे. त्या उद्‌देश्याच्या पूर्तीसाठी सत्संग, भगवद्‌भजन, निष्काम सेवा ही सरळ साधने आहेत या गोष्टी जीवनात कशा आणता येतील? त्यांचे काय महत्त्व आहे? श्रद्धेय जयदयालजी गोयन्दका स्वर्गाश्रमात वटवृक्षारवाली तसेच गीताभवन ऋषिकेश येथे ग्रीष्म-ऋतुमध्ये ३।४ महिन्यासाठी सत्संगाचे आयोजन करून विशेष रूपाने या विषयांवर प्रवचने करीत असत. त्यांचा भाव असा होता की जे सर्व बंधु येथे आले आहेत त्यांनी आपापले कल्याण करून घेऊनच येथून जावे. ते भजन, ध्यान, सेवा यांचाच आदर करीत असत. साधी वेष-भूषा, साधे भोजन, संयमित जीवन घालविण्यासाठी त्यांच्या प्रवचनांतून विशेष प्रेरणा मिळत असे. सन १९४१ च्या आस-पास त्यांनी जी प्रवचने दिली होती, ती कोणी एका सज्जनानी उतरवून घेतली होती, सरळ भाषेत अमूल्य गोष्टी जीवनांत उतरविण्यासाठी आपल्याला मिळतील या विचाराने त्या प्रवचनांना पुस्तक रूपात सादर केले जात आहे.

आम्हाला आशा वाटते की भगवत्प्राप्तीचे इच्छुक असणाऱ्या बंधुभगिनीना या पुस्तकामुळे विशेष लाभ होईल आणि अन्य बंधु भगिनींनाहीं ते वाचण्याची प्रेरणा देतील.

—प्रकाशक



॥ श्रीहरिः ॥

# भजन-ध्यान हेच सार आहे

पूज्य मामाजींच्या बरोबर बनारसला येण्याविषयी लिहिले आहे तर अवश्य आले पाहिजे, तीर्थात काळ घालवला पाहिजे, आता रतनगढ मध्ये राहण्यात विशेष लाभ नाहीं, बनारसमध्ये भजन-सत्संग यात वेळ घालवला पाहिजे, गावाच्या पाशातून सुटणे आवश्यक आहे.

काळ निघून जात आहे, जागृत झाले पाहिजे. पूज्य मामाजींच्या चरणांना स्पर्श करून नित्य वंदन करीत असालच. त्यांची सेवा करण्याचा अभ्यासही विशेष रूपाने केला पाहिजे तसेच त्यांच्या वचनांचे आज्ञांचे पालन विशेषत: केले पाहिजे. त्यांच्या इच्छेनुसार वागणे हा परम धर्म आहे, बाकी सर्व साधारण धर्म आहे. आता भजन-ध्यान या मध्ये विशेष समय घालवला पाहिजे.

संसारातील सर्व कर्तव्यकर्मे तुम्ही केली आहेत. आता तर परमार्थातच वेळ खर्ची घातला पाहिजे म्हणजे नंतर पश्चात्ताप करण्याची पाळी येणार नाही. एकान्तांत बसून नियमितपणे ध्यानसहित नामजप विशेषरूपाने केला पाहिजे, हिंडता—फिरताना, उठता,—बसताना प्रत्येक वेळी नामजप करणे आवश्यक आहे आणि मनाने सर्वत्र भगवंताचे दर्शन केले पाहिजे. मनाने भगवंताचे ध्यान, पूजा, पाठ, भोग (नैवेद्य), आरती, प्रार्थना स्तुति आणि निरन्तर जप करण्याचा अभ्यास केला पाहिजे. ज्या प्रकारे संसारी मनुष्य संसारासंबंधी संकल्प करीत असतो, त्याच प्रकारे तुम्हांला भगवंता सम्बन्धी संकल्प करीत राहाणे आवश्यक

---

(पत्र-दिनांक २०-१०-१९४०)

आहे. या प्रकारे वागण्याने भगवंताचा प्रभाव जाणता येतो आणि भगवंताच्या ठिकाणी श्रद्धा-प्रेम वाढून साधन अधिक तेज-तीव्र होऊ लागते आणि भगवंताचे दर्शन होऊन भगवंताची प्राप्ती होऊ शकते, म्हणून हे कार्य विशेष प्रयत्नाने कर्तव्य समजून करणे आवश्यक आहे.

आपण लिहिले आहे की आपल्याला तर आमचाच भरवसा आहे भगवंताला शरण गेले पाहिजे आणि त्याच्यावर भरवसा ठेवला पाहिजे. मी तर एक साधारण मनुष्य आहे. आपण लिहिले आहे की मन वश नाही, जर मनाला वश करावयाचे असेल तर गीता ६।३५-३६ श्लोकांच्या टीकेत तत्त्वविवेचनीमध्ये पुष्कळ गोष्टी लिहिल्या आहेत त्यांतील ज्या आपल्याला अनुकूल असतील त्यांचा अभ्यास केला पाहिजे. साधनेसाठी विशेष कष्ट (प्रयत्न) केले पाहिजेत. अभ्यास आणि वैराग्य यांच्या योगे मन वश होऊ शकते. भगवंताच्या नामाचा जप निरन्तर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. भगवंतास शरण गेले पाहिजे. गीता २। ७, ९।३२—३४ यातील वचनांना गतीने अनुसरून भगवंतास शरण गेले असता दिवाळे (**दिवाळखोरी**) नष्ट होऊ शकते, अभ्यास, तीव्र होऊ शकतो, भगवानही विशेष दया करू शकतात. मनुष्याच्या दयेने काहीही कार्यभाग साधत नाही.



# श्रद्धेचे महत्त्व

ज्याचा असा दृढ विश्वास अथवा श्रद्धा असेल की आता इथे भगवान विद्यमान आहेत, त्याच्याहातून पाप होऊच शकत नाही.

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम्।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति॥**

(गीता १३।१३)

तो परमात्मा सर्व बाजूस हातपाय असणारा, सर्वबाजूस नेत्र, शिर आणि मुख असलेला आणि सर्व बाजूस कान असलेला असा आहे कारण तो (संसारात) संपूर्ण विश्वात सर्वांना व्यापून स्थित आहे.

सरकारचे गुप्तहेर येथे आहेत-असा विश्वास उत्पन्न झाल्यावर तेथे सरकारच्या विरुद्ध कुठलीही कार्यवाही होत नाही. याप्रकारेच भगवान सर्वत्र आहेत असा विश्वास निर्माण झाल्यावर भगवंताच्या विरुद्ध कुठलेही काम होणार नाही. महात्म्या संबंधीही याप्रकारेच म्हणता येते.

**प्रश्न**—श्रद्धा कशी उत्पन्न होईल?

**उत्तर**—श्रद्धा उत्पन्न होण्यासाठी पहिला उपाय हा आहे की भगवंताची प्रार्थना करणे आणि दूसरा उपाय आहे आज्ञापालन करणे. शास्त्राच्या आज्ञा पाळल्यामुळे शास्त्राच्या ठिकाणी श्रद्धा उत्पन्न होते.

बाल्काला प्रथम त्याच्या इच्छेविरुद्धच विद्यालयात पाठवतात नंतर त्याला आवड उत्पन्न होते. पुढेपुढे इतकी आवड होते की घरातल्या लोकांनी रोखले तरी तो ऐकत नाही. (विद्यालयात जातोच.) याच प्रकारे कुठलेही काम असूं दे, करण्यामुळे त्यात

---

प्रवचन—दिनांक १७-१०-१९४०, रात्री ७.३० बजतां, बाँकुड़ा येथे.

श्रद्धा उत्पन्न होते. या प्रकारे भजन करता-करता भजनात, महात्म्याची आज्ञा पाळता-पाळता महात्म्याच्या ठिकाणी, आणि सत्संग करता-करता सत्संगात श्रद्धा उत्पन्न होत असते.

कर्तव्य-पालन करणे हे आपले उद्दिष्ट बनविले पाहिजे, त्याच्या फळाकडे लक्ष देऊ नये; कर्तव्य-पालन करीत राहावे. आपले जे ध्येय बनविले असेल, कटिबद्ध होऊन तत्परतेने त्याचे पालन करावे. आपली उच्चस्थिती असेल तर त्याकडेही लक्ष देऊ नये. स्वामी जर आपणास नरकात धाडतील तर तेही उत्तमच आहे, त्यातही आपण प्रसन्नच राहावे. श्रद्धा-प्रेम वाढावे म्हणून भगवंताची प्रार्थना केली पाहिजे. ही पण कामनाच आहे परंतु परमात्म्याचा प्रभाव न जाणल्यामुळेच प्रार्थना केली जाते. परमात्म्यास सांगितल्याने जलद कार्य होईल आणि सांगितले नाही तर कार्य होणार नाही, अशी गोष्ट नाही. कर्तव्य-पालन केले असता प्रभु स्वतःच सर्व काही करतील, प्रभु सर्व काही चांगलेच करतील. चांगलेच करतात इकडेही लक्ष्य देता कामा नये. आपण एवढेच पाहिले पाहिजे की आपले काम प्रभुच्या संमतीस अनुसरून होत आहे, यावरच सर्व भरवसा ठेवावा. त्यापेक्षा उच्च दर्जाची गोष्ट ही आहे की आपल्या स्वार्थासंबंधी गोष्टीचे प्रकरणच यात उपस्थित करता कामा नये.

बस, केवळ आपल्या कर्तव्याचेच पालन करीत राहावे. ईश्वराची भक्ती सर्वात श्रेष्ठ आहे. अद्वैत सिद्धान्ताचे प्रचारक श्रीशंकराचार्य यांनी हेच सांगितले आहे की सेवक जसा स्वामीच्या आज्ञेचे पालन करीत असतो त्याप्रमाणे भगवंताच्या आज्ञेचे पालन करणे हीच भक्ती आहे. तसेच प्रभूचे स्मरण ठेवणे ही गोष्ट अधिकच उत्तम आहे. '**भज्**' धातूपासून भक्तीशब्द

बनतो. आज्ञेचे पालन आणि सेवा, स्मरण हीच भक्ती आहे. ज्यावेळी आज्ञेचे पालन होत नाही तेव्हा अत्यन्त दुःख होते. आज्ञेचे पालन जेव्हा होत नाही तेव्हा रडणे हेच साधनआहे–नंतर भविष्यात आपली चूक सुधारून अत्यंत सावधान राहून आज्ञापालन केले पाहिजे.

(असली) महत्त्वाची गोष्ट तर ही आहे की आज्ञेचे पालन न करणे हा साधनामार्गातील एक अडथळा आहे. हा अडथळा अश्रद्धेमुळे येत असतो. प्रभुचे गुण, प्रभाव इत्यादि न जाणल्यामुळे अश्रद्धा असते.) प्रभु दिसतच नाहीत तर विश्वास कसा करावा? शास्त्र आणि महात्मा लोक म्हणतात की प्रभु आहेत या आधारावर प्रभु आहेत हे मानले पाहिजे.

साधन तीव्र कसे होईल? तर दृढ विश्वासाने. जितका अधिक विश्वास होईल तितके साधन अधिक तीव्र होईल. भगवान आहेत आणि ते भेटू शकतात, त्यांची प्राप्ती होऊ शकते हा दृढ विश्वास असेल तर साधन तीव्र होईलच.

भगवान वास्तविक सर्व ठिकाणी आहेतच, असा सोळा आणे (शंभर टक्के) विश्वास उत्पन्न झाल्यानेच त्यांची प्राप्ती होते. हीच गोष्ट महात्मा लोकांच्या बाबतीत जाणून घेतली पाहिजे.

श्रद्धा कमी असो वा नसो तरीही भगवंताच्या आज्ञेचे पालन केले पाहिजे. कुठल्याही निषिद्ध कर्माच्या जवळपासही कधी जाऊ नये. त्याचा तर हरेक प्रकाराने त्यागच केला पाहिजे. हट्टाने, भयाने अथवा लज्जेमुळे, कुठल्याही प्रकारे का होईना त्याचा त्यागच करावा.

ईश्वर दिसत नसला तरी त्यास मानणे आवश्यक आहे. साधु, महात्मा, शास्त्र, सांगतात की भगवान प्रत्यक्ष आहेत म्हणून या गोष्टीवर जोर द्यावा. भगवान सर्वकाही पहातात. प्रभूच्या

आज्ञेचे पालन, भजन इत्यादि केले पाहिजे. रोगी रोगाच्या निवृत्तीसाठी विश्वास ठेवून अरुचिकर असूनही कडु औषधाचे सेवन करतो, त्या औषधाने रोग मिटेल अथवा न मिटेल, परंतु हा भवरोग तर भगवंताच्या भजनाने निश्चितच मिटेल. मन भजनात लागत नसेल तरी काही हरकत नाही, भजनात आनन्द येत नसेल तरी काही हरकत नाही, मनाला अनुकूल वाटत नसेल तरीही भजन तर करीतच राहावे. हे औषध तर नक्कीच लाभदायक आहे. श्रद्धा-प्रेम असेल तर मग गोष्टच ती काय? (ते नक्कीच परिणामकारक ठरेल).

मयूरध्वजाचा हा दृढ विश्वास होता की हे भगवानच आले आहेत. त्याने म्हटले की शरीर तोडा, अशी संधी परत येणार नाही. शरीर (कापले) तोडले जात आहे, इकडे त्याच्या आनंदाला सीमा नाही. प्रल्हादास आगीत टाकले, सुधन्वास (उकळत्या) तेलाच्या कढईत टाकले. त्याहूनही अधिक ही कठीण परीक्षा आहे. तेथे तर भगवंताच्या दयेने आग थंड झाली होती. शस्त्र प्रल्हादाच्या शरीरास कापू शकत नव्हते, परंतु येथे तर त्याचे शरीर कापले जात होते आणि तरीही त्याच्या आनंदाला मर्यादा नव्हती.

दुर्योधनाची भगवंताच्या ठिकाणी श्रद्धा नव्हती म्हणून त्याला भगवंताची प्रत्येक क्रिया खटकत होती. त्याला भगवंताची एकही क्रिया चांगली वाटत नव्हती.गोपींना भगवंताची एकही क्रिया भारी वाटत नव्हती. प्रत्येक क्रिया त्यांना आनंद देणारी होती. केवळ एक वियोग त्यांना सहन होत नव्हता.

भगवान संध्याकाळी गायी चारून परत येत, त्यांचे ते धूलि-धूसरित अंगही त्यांना फार मनोहर वाटत असे. ती धूळही भगवंताचा अलंकार बनली. गोपींच्या साठी भगवंताच्या साऱ्या

क्रिया शोभादायक आहेत. बालकांच्या बरोबर बसून भोजन करीत आहेत, कोणतीही क्रिया करीत असोत, असुरांना मारण्याची, तोडण्याची सर्व क्रिया आनन्ददायकच होत्या. अशी एकही क्रिया नाही की जी गोपींना आनन्ददायक वाटत नाही.

ज्या पुरुषांची भगवंतावर श्रद्धा आहे त्यांना त्यांचे दूषणही भूषणच वाटत असते. जसे भगवान कंसाला मारण्यास जातात, धोब्याला मारून त्याचेजवळील कपडे काढून घेतले, परंतु भगवंताच्या प्रेमी, श्रद्धाळू भक्तांना ही क्रिया खटकली नाही, उलट आनन्ददायकच वाटली. पूतनेला मारले, श्रद्धाळू तर असेच म्हणतील की पूतनेचा उद्धार केला. जितक्या असुरांना मारले त्या सर्वांचा उद्धार झाला.



# भगवत प्रेमाची विशेषता

**प्रश्न**—कितीही तान तणाव असू दे, मन भगवंता पासून हटणार नाही, दूर जाणार नाही, यासाठी काय उपाय आहे?

**उत्तर**—भगवंतावर जर प्रेम असेल तर कितीही झंझट असले तरी वृत्ती भगवंतापासून हटून, दूर जाऊच शकत नाही.

**प्रश्न**—या प्रकारची स्थिती कशी होईल? भगवंतावर प्रेम कसे जडेल?

**उत्तर**—भगवंताचे गुण आणि प्रभाव यांचे रहस्य जाणल्याने.

**प्रश्न**—ते कसे जाणले जातील? अशी वृत्ती कशा प्रकारे होईल?

**उत्तर**—जाणकार पुरुषांचा संग, भजन, ध्यान, भगवंताची प्रार्थना करण्यामुळे भगवंताच्या कृपेने भक्ती सफल होते. भगवान सदा सर्वदा सर्व जागी विद्यमान आहेत असा विश्वास करावा, शास्त्र आणि महात्मा लोकांच्या वचनांवर विश्वास ठेवावा. मन आणि बुद्धि यामध्ये निश्चय करावा की गुणांमध्ये भगवंताहून श्रेष्ठ या संपूर्ण जगात कोणीही नाही. भगवान गुणांचे सागर आहेत. सर्वज्ञ, सर्वव्यापी आहेत या प्रकारे विश्वास करावा. केवळ सर्वशक्तिमान असतील आणि सर्वज्ञ नसतील तर काम चालणार नाही, भागणार नाही. कुणी दयाळू असेल परन्तु सामर्थ्य नसेल तर तो काय करू शकणार आहे? सामर्थ्यवान पण दयाळू नसेल तरीही काम चालू शकत नाही. भगवान असे आहेत की त्यांच्यात सर्व प्रकारची शक्ती आहे आणि ते अप्रमेय आहेत, परम दयाळू आहेत. या प्रकारे जाणून घेऊन एकांतात बसून आर्तभावाने प्रार्थना

---

प्रवचन—दिनांक १८-१०-१९४०, रात्री, बाँकुड़ा.

केली तर काम होऊ शकते. असे केल्याने त्यांचे स्मरण आपोआप होऊ शकते. सतत, प्रत्येक समयी भगवंताचे भजन, ध्यान केल्याने प्रेम उत्पन्न होऊ शकते आणि प्रेम उत्पन्न झाले की भजन-ध्यान (सहजच) होऊ लागते.

संसारात प्रियबुद्धि (ममत्व) होत आहे म्हणून संसारात आसक्ती आहे. संसारात प्रेम आहे या कारणामुळेच भजन-ध्यान होत नाही. भगवंताच्या प्रेमात त्यामुळे बाधा येत आहे म्हणून संसारास घृणित (तिरस्कृत) समजून संसारा संबन्धी वैराग्य आणले पाहिजे. नंतर संसारासम्बन्धी वैराग्य आणि भगवंता-सम्बन्धी प्रेम उत्पन्न झाल्याने भजन स्वतः आपोआप होऊ लागते. संसार रमणीय वाटतो आहे. जर हे जाणले जाईल की ही संसाराची सुंदरता केवळ देखाव्यासारखी आहे, सुगन्ध नसलेले फूल आहे, स्वप्नवत आहे,. जाग आली की काहीही नाही तर संसारासम्बन्धी आपोआप वैराग्य येईल.

खरे सुख तर भगवंताच्या ठिकाणीच आहे. भगवान वास्तविक आनन्दरूप आहेत. अमृतमय आहेत. त्यांचे नाम, रूप, गुण, लीला, प्रभाव सर्व अलौकिक आहे, मधुर आहे, चित्ताला आकर्षित करणारे आहे. या प्रमाणे भगवंताला समजून भजन ध्यान केले असता चित्त त्यांच्यात रमून जाते. नंतर त्याला संसारांतील कुठलीही वस्तु चांगली वाटत नाही. जर तुलना करावयाची म्हटले तर प्रभु समान काहीही नाही. तुलसीदासांनी म्हटले आहे—

**निरुपम न उपमा आन राम समान रामु निगम कहै।**
**जिमि कोटि सत खद्योत सम रबि कहत अति लघुता लहै॥**
**एहि भाँति निज निज मति बिलास मुनीस हरिहि बखानहीं।**
**प्रभु भाव गाहक अति कृपाल सप्रेम सुनि सुख मानहीं॥**

जर जगातील सगळे गुण एकत्रित केले गेले तरी त्यांच्या शक्तीच्या एका थेंबाचीही बरोबरी होऊ शकणार नाही.

**प्रश्न**—श्रद्धेचे स्वरूप काय आहे? असे ऐकतो की श्रद्धावान पुरुषांची संगती केली पाहिजे, भगवंताच्या गुणानुवादाचे वर्णन केले पाहिजे, हे कशा स्वरूपात आणि कसे करावे?

**उत्तर**—ज्या पुरुषांना भजनासंबंधी प्रेम आहे, त्या पुरुषांची प्रेमाने संगती करावी अथवा ते जे काही सांगतील, त्याचे त्यांच्या वचनावर विश्वास ठेवून पालन करावे. भगवंताच्या गुणांसंबंधी-प्रभावासंबंधी गोष्टी ऐकून त्यास अनुसरून अनुष्ठान करावे अथवा त्या गोष्टीप्रमाणे आचरण करावे.

श्रद्धाळू पुरुषांचा निश्चय आणि विश्वास दृढ असतो. कितीही आपत्ती आल्यातरी त्यांचे मन आणि बुद्धि सिद्धान्तापासून विचलीत होत नाहीत.

साधु, महात्मा वगैरे सांगतात की संसारात या विश्वांत अलौकिक पदार्थ दिसून येतात त्यांचे संचलन करणारा परमात्माच आहे. सर्व ठिकाणी परमात्मा आहे. ईश्वराचे अस्तित्व स्वीकारलेत की नंतर तो कसा आहे हे तर तो स्वतःच तुम्हांला जाणवून देईल. नंतर ईश्वराच्या विरुद्ध आचरण होऊच शकत नाही. ईश्वराच्या विरुद्ध कार्य हातून घडत असेल तर ईश्वरावर विश्वासच नाही असे म्हणावे लागेल. पापाच्या प्रवृत्तीचे स्फुरणच होऊ शकत नाही. जर पापाची क्रियाही होत असेल मग तर विश्वास तरी कोठे आहे?



# अन्तकालाची स्मृती तथा भगवत प्रेमाचे महत्त्व

प्रभूचे अनन्य चिन्तन, निरन्तर चिन्तन करावे, दुसऱ्या कुणाचे स्मरण होऊच नये. कुणी व्यक्तीने एकदा जरी असे म्हटले की मी तुझा आहे तर भगवान म्हणतात की मी त्याला सोडतच नाही.

**सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते।**
**अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद्व्रतं मम॥**

(अध्यात्मरामायण ३।१२)

माझा हा नियम आहे की जो एक वेळ मला शरण येऊन 'मी तुझा आहे' असे म्हणून माझ्याकडे अभय मागतो त्याला मी समस्त प्राण्यांपासून निर्भय करतो.

दया इतकी आहे की स्मरणमात्रे सुद्धा कल्याण होते. अन्त:कालीन स्मृतिमध्ये कसा दयाळूपणा भरलेला आहे. यामध्ये प्रभूची दयालुता, समता आणि न्यायशीलता भरलेली आहे. ज्याचे कुणाचे स्मरण करीत जाल त्याची प्राप्ती होईल. दयेची हद्द, परिसीमा केली आहे; अन्त:कालीन स्मृतीला इतके महत्त्व का दिले आहे ? त्या बिचाऱ्याचे मनुष्य जीवन समाप्त होत आहे, भगवान विचार करतात की मी असे विधान बनवतो की एका मिनीटात उद्धार होऊन जाईल.

**लगन लगन सब कोइ कहे लगन कहावे सोय।**
**नारायण जा लगनमें तन मन दीजै खोय॥**

परमात्म्यासाठी सर्वस्वाचा त्याग करण्यास तयार व्हावे अन्य कुठल्याही गोष्टीला महत्त्व देऊ नये. परमात्म्याची प्राप्ती होण्यास विलंब होत आहे ही आपलीच कमतरता उणीव आहे. आपल्या विश्वासाच्या कमतरतेमुळे विलंब होत आहे. भगवान तर सर्व ठिकाणी विद्यमान आहेतच, आहेत.

---

प्रवचन—दिनांक २०-१०-१९४०, बाँकुड़ा.

एक मनुष्य आपल्या जवळच उभा आहे, आपण जर विचारले की त्या मनुष्याला भेटण्यास किती विलम्ब आहे तर दुसरा मनुष्य हसेल आणि म्हणेल की काय मूर्ख माणूस आहे ? तो तर जवळच उभा आहे, जेव्हा इच्छा असेल तेव्हा भेट. जसे एखाद्या स्त्रीच्या गळ्यातच हार आहे आणि ती चोहीकडे त्याचा शोध घेत आहे !

सम्बन्धी लोकांचा वियोग होणार, ही गोष्ट तर आहेच परन्तु आता तरी त्यांच्यापासून काय सुख आहे. लाकडाचे लाडू खाल्ले तरी पश्चात्ताप, न खावे तरीही पश्चात्ताप. एका जाटाला सात पुत्र होते, सहा तर विवाहीत होते एक अविवाहीत होता. कुणी तरी विचारले किती पुत्र आहेत ? त्याने सांगितले, एक ! सहा जणाना डाकिणींनी नेले आहे.

**ससुरारि पिआरि लगी जब तें। रिपुरूप कुटुंब भए तब तें॥**

म्हणून आपला तर एक परमात्माच आहे.

**उमा राम सम हित जग माहीं। गुरु पितु मातु बंधु प्रभु नाहीं॥**
**सुर नर मुनि सब कै यह रीती। स्वारथ लागि करहिं सब प्रीती॥**

माझ्या मागे ही पाच-सात मुले-मुलींचा जंजाळ लागला नाही हे तर उत्तम आहे. मला जर कुणी पुत्राच्या मरणाचा शाप देईल तर तो मला लागू पडणार नाही. माझ्या घराच्या मागील बाजूस राहणाऱ्या धानुकास सात-आठ मुलगे झाले, त्याची स्त्री सर्व दिवस भर रडत असे की माझ्या सारखे दुःखी कोणी नाही. म्हणून पुत्र असले तरी ना जिवंत असताना सुख असते ना मेल्यानंतर सुख असते. मेल्यानंतर त्याची स्त्री जणु उरावर बसून राहाते. पति दटावू तर शकतो, पुत्रच नसेल तर यातील कुठली एकही गोष्ट घडली नसती. सर्वात मोठे दुःख पुत्रशोकाचे असते. ज्याला पुत्रच झालेला नसेल त्याला पुत्रशोक कसा होईल ?

या प्रकारे होऊनही त्याग केला तर त्यालाही शाप लागत नाही.

सर्वांबरोबर उदारतेचा व्यवहार करावा, आलेल्या याचकास हाताने उत्तर द्यावे. असे रूप धरावे—

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति॥**

(गीता १४। २२)

हे अर्जुना! जो पुरुष सत्त्वगुणाच्या कार्यरूप प्रकाशाचा आणि रजोगुणाच्या कार्यरूप प्रवृत्तीचा तसेच तमोगुणाच्या कार्यरूप मोहाचाही त्यात प्रवृत्त झाल्यावर त्यांचा द्वेषही करीत नाही अथवा निवृत्त झाल्यावर त्यांची आकांक्षा-इच्छाही करीत नाही—

गेले तर जावोत, आले तर येवोत, द्वेष करू नये. श्रद्धा प्रेमाला नेहमी बरोबर बाळगते. प्रेम श्रद्धेशिवायही होऊ शकते. आईचे मुलावर, गाईचे वासरावर प्रेम असते, श्रद्धा नसते. आपापल्या स्थानी दोन्हीही ठीकच आहेत. प्रेमाचे मूल्य भक्ती मार्गात आहे. श्रद्धेची आवश्यकता दोन्ही मार्गात आहे. ज्ञानमार्गात श्रद्धेची प्रधानता आहे. वास्तविक भक्ति आणि ज्ञान एकच गोष्ट आहे. ईश्वराच्या ठीकाणी परमप्रेम-अनुराग हीच भक्ती आहे आणि तीच खरी अस्सल भक्ती आहे. म्हणून प्रेम हेच अस्सल आहे. प्रधान आहे. भक्तिमार्गात सर्वात श्रेष्ठ प्रेम आहे आणि ज्ञानमार्गात सर्वांत श्रेष्ठ श्रद्धा आहे. परस्पर तारतम्यता ठेवण्यासाठी दोन्हीची आवश्यकता आहे. जसे अन्न श्रेष्ठ आहे अथवा जल? दोहोची आवश्यकता आहे त्या प्रमाणेच श्रद्धेशिवायचे प्रेम काय कामाचे?

कुणाला तडफडवून मारायचे असेल तर खूप खायला द्यावे आणि पाणी देऊच नये त्याप्रकारचे श्रद्धेशिवायचे प्रेम आहे. श्रद्धा असेल तर प्रेम आपोआप उत्पन्न होते. श्रद्धा प्रेम उत्पन्न करणारी आहे. श्रद्धेशिवाय भक्ति मार्गीय अथवा ज्ञानमार्गीय कुणाचेही काम चालू शकत नाही. प्रेमाशिवायही चालू शकत नाही. श्रद्धा कमी

झाली अथवा दूर झाली की प्रेमही कमी होते, नष्ट होते. श्रद्धा हे मूळ आहे. एक श्रद्धा जडली की सर्वकाम आपोआप होऊ शकते.

प्रल्हाद खरोखर धन्य आहे, की त्याने पाषाणातून प्रभूला प्रकट केले. श्रद्धेनेंच त्यांना प्रकट केले. आपण सुद्धा खांबातून अथवा वरवंट्यातून अथवा जलातून, अग्नितून किंवा आपणास इच्छा असलेल्या वस्तूमधून भगवंतास प्रकट करू शकतो. सूर्याच्या ठिकाणी श्रद्धा ठेवा की हे साक्षात नारायण आहेत. आपल्या आत्म्यामध्ये श्रद्धा बाळगा. त्यातही श्रद्धा होत नसेल, तर मग व्हा खराब आणि सारखे जन्मा आणि मरा! या विश्वात कशावर तरी श्रद्धा ठेवा. आधाराशिवाय तर दुर्दशाच दुर्दशा आहे. कुणाचा तरी आधार असायला पाहिजे. आपल्यावर कुणी एक तरी शासन करणारा असावा. स्वतन्त्र राहिलात की बुडालात. शास्त्रास मानत नाही तर पाप कोण मानणार. जितकी पापे आहेत त्यांचा निर्णय तर शास्त्रच करीत असते ना. शास्त्राचे शासन असावे अथवा ईश्वराचे भय असावे किंवा महात्म्याचे शासन मानावे. रोगी जर वैद्याचा सल्ला मानेल तर मग कुपथ्य करणार नाही.

कुपथ्य करेल तर रोगी मरून जाईल, वैद्याच्या शासनामुळे तो कुपथ्यापासून वाचेल. या प्रकारेच महात्म्याचे शासन मानून पतनापासून वाचायचे आहे. नीच योनी मध्ये पडणे हाच त्याचा नाश आहे. परलोक, ईश्वर ,महात्मा यांच्या ठिकाणी श्रद्धा ठेवणे हाच पापांपासून बचाव करण्याचा उत्तम उपाय आहे.

भगवंताचे अस्तित्व न मानण्यात पाप, अश्रद्धा हेच कारणीभूत आहेत. पूर्वसंचितपाप हेच कारण आहे.

ईश्वर, महात्मा, परमात्मा सर्व तर आहेतच. श्रद्धा नसेल तरीही चांगल्या पुरुषांचा सल्ला मानून काम केले तर श्रद्धा उत्पन्न होते. सत्संगात प्रीती नसेल तरीही सत्संगात सतत जाता-जाता प्रीती उत्पन्न

होऊन जाते. विद्येमध्ये प्रीती नसेल तरी शिकता शिकतांना प्रीती उत्पन्न होते. भजन करता-करता भजनात प्रेम उत्पन्न होते. पित्ताचा विकार आहे; मिश्री खारी लागते, पण खाता-खाता गोड लागू लागते. भगवंताचे भजन अमृतमय आहे. भवरोगामुळे ते गोड वाटत नाही. पण भजन करता-करता ते गोड-प्रिय वाटू लागते. औषध समजून जरी भजन केले तरीही ते पापांचा नाश करते. ज्यांनी भजनांतील आनंदाची चव चाखली असेल ते तर भगवंताच्या प्राप्तीसंबंधी-भेटीसंबंधी प्रश्न सुद्धा करीत नाहीत. भगवान भेटल्यावर तर भजन होईल ना, जर भगवान भेटल्यावर भजन-ध्यान सुटणार असेल तर ते भगवंताच्या भेटीसही आवश्यक समजत नाहीत. प्रेमाचे तत्त्व भगवान अधिक जाणतात. किती भजन केल्यावर भगवान भेटतील, ही चर्चा करू लागले असता प्रेमी लगेच म्हणतो, राम! राम! हे काय धरून बसला आहात. भजन करतांना काय तुमच्या हाताला काटे बोचतात का?

ज्यांना भजन करणे अवघड वाटते त्यांच्यासाठी साडे तीन कोटी नाम मन्त्र-जपाची संख्या सांगितली गेली आहे. आपल्याला तर आपले जीवनच भजनावर निर्भर आधारीत करावयाचे आहे,. भगवंताला भेटण्याचा प्रश्नच उपस्थित होऊ देऊ नये. कोणी जर विचारले की भगवान आपल्याला भेटले की नाही तर म्हणावे अरे, राम! राम! हे आपण काय विचारता! कुठे मी तुच्छ व्यक्ती आणि कुठे भगवान, आपण जे म्हटलेत की मी भजन करतो हाच माझ्या दृष्टीने कलंक आहे. भगवंताच्या घरींही जर न्याय असेल तर माझ्यासारख्या पामराला भगवत दर्शन कसे घडेल? भक्ती करणारातही जो आपल्याला लायक समजत नाही तो भगवंताच्या निकट पोहोचतो आणि जो म्हणतो की मी इतके ध्यान भजन करतो, त्याच्यापासून भगवान दूर जातात की हा तर जगाकडून प्रमाणपत्र मिळविण्याची इच्छा करीत आहे, माझे दर्शन जग घडवून देणार आहे का? जो असे समजतो,

इच्छितो की जगाने मला सर्वश्रेष्ठ मानावे, तो सर्वांपेक्षा नीच खालच्या दर्जाचा आहे. भगवान म्हणतात की जगाने जरी तुला सर्वांपेक्षा वाईट मानले तरी तुझे काय नुकसान आहे ? जेव्हां मी तुला श्रेष्ठ मानत आहे. जगापासून तर आपले गुण लपवून ठेवले पाहिजेत.

अधिकांश व्यक्ती भगवंताचे भजन-पूजन भगवंतासाठी करीत नाहीत, तर आपली पूजा व्हावी यासाठी करतात. हा भाव नसेल तर हा विश्वास उत्पन्न होईल की आपण आपल्याला श्रेष्ठ मानणे हेच मुळी पाप आहे. मग विलम्बाचे काय काम ? हा भाव दूर होताच भगवान भेटतील. भगवंताच्या प्राप्तीत हीच बाधा (अडथळा) होत आहे.

आता तरी आपले उरलेले आयुष्य भगवंतास अर्पण करा. मनाला विचारा की तुला काय पाहिजे ? एकदम निरपेक्ष होऊन राहा. जगाचा मोह वाढविणे म्हणजे संकट ओढवून घेणे आहे. भगवंतानी तर ही घोषणा केली आहे की माझ्यावरच प्रेम कर. इतके वैराग्य उत्पन्न व्हावे की संसारात जितके म्हणून भोग्य पदार्थ आहेत त्या सर्वांबद्दल घृणा उत्पन्न व्हावी. कांचन आणि कामिनीचे नावही चांगले वाटू नये. '**समलोष्टाश्मकाञ्चनः**' अशी स्थिती प्राप्त व्हावी. रूपयांचे नावही चांगले वाटू नये. विषयभोगांच्या त्यागासाठी या पुढील श्लोकावर लक्ष द्यावे.

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते।**
**आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः॥**

(गीता ५ । २२)

हे जे सर्व इन्द्रिये आणि विषयांच्या संयोगाने उत्पन्न होणारे भोग आहेत ते जरी विषयी पुरुषांना सुखरूप भासत असले तरीही ते दुःखासच हेतु कारण ठरतात आणि ते आदि-अन्त असणारे अर्थात अनित्य आहेत. म्हणून हे अर्जुना! बुद्धिमान विवेकी पुरुष त्यांच्यात रमत नाही.

तरुणींतहीतरुण स्त्रीने स्पर्श केला असता, इन्द्रियांसही हस्तस्पर्श केला असता ज्याच्या ठिकाणी कामविकार उत्पन्न होत नाही, तोच पुरुष सर्वांत श्रेष्ठ आहे. खूप वैराग्य आवश्यक आहे. वैराग्यसम्पन्न होऊन संसारांत (जगात) विचरण करावे. श्रद्धा कमी होण्यास कुसंग आणि पापच कारण आहेत. एक तर पापाची कमाई येत असेल अथवा कुसंग कारण असेल.

**प्रश्न**—त्या वेळी इतकेच समजले जाते की पाहिजे तितकी हानि होऊ दे पण सत्संग सुटू नये.

**उत्तर**—ज्यावेळी प्रेम असते त्यावेळी असेच होत असते. हीच गोष्ट घनश्यामची आहे. यापेक्षाही अधिक आहे. त्याच्या घरचे काम असेल, त्याची स्त्री (पत्नी) ही कदाचित् नाराज होत असेल अथवा आणखीही नुकसान होत असले तरी तो पर्वाच करीत नाही.

विषयासक्त पुरुषांचा संग, विषयांचा संग हे पतन करणारे आहेत. सर्वात अधिक वाईट संग विषयासक्त पुरुषांचा आणि नास्तिकांचा आहे.

सत्संगात राहिले असता, कितीही विषय असले तरी त्यांचा (वाईट) परिणाम होऊ शकत नाही. जसे गंगेच्या किनाऱ्यावर उन्हाचा त्रास होत नाही. गंगा आपल्या शीतलतेने उष्णतेच्या परिणामास कमी करते. त्याप्रमाणेच सत्संग विषयांचे विकार कमी करतो.

भजनाचे फळही भजनच असले पाहिजे. भगवंताचे दर्शन यासाठी हवे असते की त्यानंतर भजन वाढावे. जगास जवळ करू नये, लोकांपासून तर लपूनच राहावे. मनुष्य स्वतःचे गुण जितके लपवीतो तितके भगवान त्याच्या निकट येतात.

आपल्यावर लोक जर मिथ्या दोषारोप करीत असतील तर

त्यायोगे आपला खूप फायदा होतो. खरा गुण जरी प्रकाशित झाला तर आपले साधन नष्ट होत असते. ज्याप्रमाणे धन प्रकाशित केले असता नष्ट होते त्याप्रमाणेच.

आपल्या मनाविरुद्ध जे जे काही घडते ते ते भगवन्तास अनुकूल असते. जो असे मानतो त्याच्यावर भगवान खूप प्रसन्न होतात. जी गोष्ट आपल्या मनाच्या प्रतिकूल असते तीच दुःख देते. भगवंताने केलेलेच हे विधान आहे. पापांचे फळ भोगावयास लावून भगवान मला पवित्र करीत आहेत, हे ज्याने जाणले तोच भगवंताचे रहस्य जाणतो. त्यास हे जाणल्यानंतर चिन्ता, दुःख, भय, घृणा, द्वेष, वैर आदि विकार होत नाहीत. जर एखाद्या गोष्टीस भगवान अनुकूल नसतील तर कोणाचे सामर्थ्य आहे की तो असे काही करू शकेल? जर ती गोष्ट प्रभू करवीत आहेत तर त्यातच आपले हित आहे. ते भगवंताने धाडलेलेच विधान आहे—

**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित्।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः॥**

(गीता १२।१९)

जो निन्दा–स्तुतिला समान समजणारा, मननशील, आणि ज्या कशाही प्रकारे शरीर निर्वाह होईल त्यामध्ये सदाही सन्तुष्ट असतो आणि राहाण्याच्या स्थानाबद्दल जो ममता आणि आसक्तीरहित असतो असा स्थिरबुद्धी भक्तिमान पुरुष मला प्रिय आहे.

रजोगुण आणि तमोगुणाचा त्याग करावा कारण ते बाधक आहेत. सत्त्वगुण बाधक नाही त्याचा संग्रह करावा. गुणातीत झाल्यावर सत्त्वगुणाचा त्याग स्वतःच (आपोआप) घडतो. तो तर आपल्यासाठी (हितकारक) साधक आहे.



# भगवान शीघ्रातिशीघ्र कसे भेटतील ?

भगवान शीघ्रातिशीघ्र कसे भेटतील? यासाठी दोन गोष्टी आवश्यक आहेत—

(१) आतुर दुःखी लोकांची सेवा

(२) धर्माच्या रक्षणासाठी प्राण अर्पण करणे. याची परीक्षा आपत्तीच्या वेळी होत असते. भगवान म्हणतात '**स्वधर्मे निधनं श्रेयः**'.

गुरुगोविन्द सिंह यांचे मुलगे धर्मासाठी मेले, त्यांची कीर्ती तर संसारात (जगात) आहेच, गतिही त्यांना उत्तमांत ही उत्तम मिळणे आवश्यक आहे.

धर्मासाठी प्राण देणे-तेथे त्या स्थळी आपल्या प्राणांची आहुति देणे हा मुक्तीचा मार्ग आहे. अशी वीरता पंजाबमध्ये आहे नेपाळ आदि देशात आहे. ज्या ठिकाणी घोर अत्याचार होत असेल त्या स्थळी मनुष्य प्राण त्यागण्यास तयार होईल तर त्यास भगवान दर्शन देतात.

चीर हरण प्रसंगी द्रौपदीने केलेत्या प्रार्थनेचे उदाहरण—भगवान सर्व ठिकाणी सदाच वर्तमान (विद्यमान) आहेत, जेथे द्रौपदी सारखी आतुरता असते तेथे ते प्रकट होतात. रुक्मिणीच्या आतुरतेमध्ये भगवंतानी दर्शन दिले.

कोणावर जर विपत्ति आली तर भगवान त्याचे रक्षण करतात. कोठे अप्रकटपणे तर कोठे प्रकटपणे रक्षण करतात.

बरेच बंधु दुसऱ्यांना वाचविण्यासाठी आपले प्राण अर्पण करतात. कोठे तर असेही होते की धर्माचे रक्षण होते कुणी मरून जात असेल तर त्यास मुक्ती मिळते.

---

प्रवचन—दिनांक ८-६-१९४०, वटवृक्ष, स्वर्गाश्रम.

धर्मरक्षणासाठी, देशाच्या रक्षणासाठी प्राण त्यागले असता जगात त्याची वीर म्हणून कीर्ती पसरते आणि मेल्यानंतर मुक्तीही मिळते.

कानपुरच्या गणेशशंकर या विद्यार्थीचे उदाहरण—ते धर्मासाठी मेले. त्यांची इच्छा होती की जगांत शांती पसरावी. ते धर्माचे पालन करता करता मेले. गुरुगोविन्द सिंहाच्या मुलांची हकिकत अशीच आहे. प्रत्यक्ष कुणी असे सांगू शकत नाही की त्यांना भगवंताचे दर्शन झाले, परन्तु शास्त्राच्या आधारे उत्तम गती तर मिळायलाच हवी.

सर्वात श्रेष्ठ गोष्ट ही आहे की जेथे जेथे पापाचार दिसेल, अधर्म दिसेल तेथे आपण आपले बलीदान करावे. वाटल्यास जगात धर्माचा प्रचार करण्यासाठीही आपण आपले बलीदान करावे.

**धीरज धर्म मित्र अरु नारी । आपद काल परिखिअहिं चारी ॥**

धैर्याची परीक्षा—कुठलीही आपत्ती आली तर ती आनंदाने सहन करावी, त्यावेळी धैर्याची परीक्षा होत असते. आपत्तीच्या समयी वीरताच उपयोगी पडते. भय न बाळगता धैर्य आणि शौर्य (वीरता) यांचा उपयोग केला पाहिजे.

तोच खरा शूरवीर आहे जो धैर्याने संकटास रोखून धरतो, फिरत राहील पण पाठ दाखविणार नाही. प्रत्येकाने हे लक्षात घेतले पाहिजे की कोठलीही आपत्ती येऊ दे, ती आनंदाने सहन करावी. जेथे कुणाचा धर्मनाश होत असेल, कुठल्या गायीची हत्या होत असेल अथवा कुठल्याही प्रकारचे पाप घडत असेल तर तेथे आपल्या प्राणांचा त्याग करणे हाच एकमात्र उपाय आहे.



# अनन्यभक्ति

गीतेच्या शेकडो श्लोकांपैकी एक श्लोक धारण केल्यानेही आपले कल्याण होऊ शकते.

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम्।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्॥**

(गीता ९। २)

हे विज्ञानसहित ज्ञान सर्व विद्यांचा राजा, सर्व गोपनीय गोष्टींचा राजा, अति पवित्र, अति उत्तम, प्रत्यक्ष फळ देणारे, धर्मयुक्त साधन करण्यात अत्यन्त सुगम आणि अविनाशी आहे.

भक्ति राजविद्या आहे हिचे दुसरे नाव राजगुह्य आहे. जेथे कुठे गीतेत गुह्यतम शब्द आढळतो तो तेथे भगवंताच्या अनन्य भक्तीच्या संदर्भातच आढळतो. लक्षात ठेवा—आपण भगवंताची प्राप्ती करून घेतली नाही आणि प्रळय झाला तर परत जेव्हा सृष्टी उत्पन्न होईल त्यावेळी आपल्याला परत या जगात यावे लागेल.

भोजन करण्यामुळे ज्याप्रमाणे प्रत्यक्षात क्षुधेची निवृत्ति होत असते त्याप्रमाणे भजन करण्यानेही प्रत्यक्षात शान्ति-आनन्द यांची प्राप्ती होते.

भगवान सांगतात-माझ्या प्राप्तीचा मार्ग सुगम आहे, तुम्ही कठीण का मानत आहात?

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥**

(गीता ९। ३०)

जर कोणी अतिशय दुराचारीही अनन्यभावाने माझा भक्त होऊन मला भजत असेल तर तो साधुच मानण्यायोग्य आहे, कारण तो यथार्थ निश्चय करणारा आहे. अर्थात् त्याने उत्तम प्रकारे असा निश्चय

केलेला आहे की भगवंताच्या–परमेश्वराच्या भजनासारखे श्रेष्ठ दूसरे काहीही नाही.

अति पापीही शीघ्र भगवंताची प्राप्ती करू शकतो मग धर्मात्मा असेल त्याची गोष्टच काय सांगावी ? या सर्व गोष्टींचा नीट विचार करून आपण सर्व लोकांनी भगवंताच्या भक्तिविषयी तत्पर होणे आवश्यक आहे.

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि॥**

(गीता ९ । ३)

हे परंतप! या उपर्युक्त धर्मामध्ये श्रद्धारहित असणारे पुरुष मला प्राप्त करून न घेता मृत्युरूप संसारचक्रात भ्रमण करीत राहातात.

मला प्राप्त करून न घेता संसार चक्रात फिरत राहातो असे का म्हटले आहे ? चोरी, व्यभिचार करणारांसाठी असे म्हणणेही ठीक वाटत नाही की माझी प्राप्ती न होता नरकास जातात. अशा प्रकारचेच येथील वचन आहे पण येथे एक रहस्य आहे. राजाच्या पुत्राचा राज्यावर जन्मसिद्ध अधिकार असतो. त्या प्रमाणेच मनुष्याचा जन्मसिद्ध अधिकार आहे की त्याने परमात्मप्राप्ती करून घ्यावी. राजपुत्र जर प्रजेवर अन्याय करीत असेल, प्रजेला त्रास देत असेल तर राजा लाचार होऊन त्या राजपुत्रास कैदेत टाकतो. येथे राजाच्या स्थानावर भगवान आहेत आणि राजपुत्राच्या स्थानावर आपण सर्वलोक आहोत, राजधानीचा अर्थ समस्त संसार आहे, चौऱ्यांशी लक्ष योनी हा तुरुंग आहे. राज्याची प्राप्ती न होता माणूस कैदेत पडतो. **'मां अप्राप्य'** माझ्या प्राप्तीचा अवसर मिळूनही चौऱ्याशीं लाख योनींच्या चक्रात सापडतो. भगवंताने दया करून हा अवसर–ही संधी दिली होती.

**कबहुँक करि करुना नर देही। देत ईस बिनु हेतु सनेही॥**

अशा शरीराची प्राप्ती होऊनही जो आपल्या आत्म्याचे कल्याण करीत नाही, संशयात भ्रमत राहातो तो मूर्ख आहे. म्हणून एक एक करून कल्याण करून घ्या. भगवंतानी राजविद्या आदि आठ विशेषणे लावली आहेत, पूर्ण अध्याय भगवंताच्या भावात ओवला (गुंफला) गेलेला आहे. कमीत कमी सव्वीसाव्या श्लोकापासून चौतीसाव्या श्लोकापर्यंतच्या व्याख्येवर (टीकेवर) ध्यान द्यावे. प्रत्येक श्लोकात विशेषता आहे. प्रयत्न तर करा, विश्वास करा. भवसागरांतून सुखाने तरून जाण्याची इच्छा असेल तर भक्ति करा.



# माझा सिद्धान्त आणि व्यवहार

माझ्या सिद्धान्तानुसार भक्ति आणि ज्ञानाच्या मार्गात समानता आहे., युगल उपासना मात्र नाही, कोणी भक्तीला श्रेष्ठ मानतात एवं युगल उपासना करतात. शास्त्राच्या हिशोबाप्रमाणे सर्व एक आहे. ध्रुवाने केवळ भगवंताची उपासना केली, प्रह्लादाने केवळ भगवंताची उपासना केली आणि भगवान आले पण तेही एकटेच. मग असे कसे म्हणता येईल की युगल उपासने खेरीज भगवान भेटू शकत नाहीत. मी तुमच्या मान्यतेची निन्दा करीत नाही, मान्यता तर आपलीही चांगलीच आहे, आणि माझीही चांगलीच आहे, परन्तु जर तुम्ही असे म्हणाल की तुमची मान्यता अयोग्य आहे, तर मी ते स्वीकार करणार नाही. प्रारम्भापासूनच माझ्या ध्यानात ही गोष्ट पक्की बसली आहे की स्त्रीला दूरच ठेवली पाहिजे. मला हे समजून आले आहे की हा फार मोठा दोष आहे. जो कोणी यांचा (स्त्रियांचा) अधिक संसर्ग करीत असेल त्याने यांच्या पासून अत्यन्त सावधान राहावे. प्रत्यक्ष फळाकडे लक्ष द्यावयास हवे, भावी फळाकडे नको. मनुष्याचे पतन घडवून आणणाऱ्या चार गोष्टी आहेत—स्त्री, शरीराचा आराम, कांचन आणि मोठेपणा-(मान सन्मान, प्रतिष्ठा). कुणी कवीने म्हटले आहे—

**कंचन तजना सहज है सहज त्रियाका नेह।**
**मान बड़ाई ईर्ष्या दुर्लभ तजना एह॥**

मोठेपणामध्ये अहंकार, कांचनात लोभ, स्त्रीमध्ये काम आणि शरीराच्या आरामात-सुखसोयीमध्ये मोहाची प्रधानता आहे,. काम, लोभ, मोह आदि फार मोठे शत्रु आहेत. भगवंतानी

---

प्रवचन—दिनांक ११-४-१९४६, प्रातःकाल ८.४५ बजतां, राजाजीची कोठी, स्वर्गाश्रम.

आत्म्याचे दमन करणारी नरकाची तीन द्वारे सांगितली आहेत. काम, क्रोध एवं लोभ. काम, क्रोध आदिचे निवारण करण्याचा उपाय हा आहे की ज्याप्रमाणे पोलिसाला हाका मारू लागताच डाकू-चोर पळून जातात, त्याप्रमाणेच भगवंतास हाका मारू लागतांच हे तीन्ही शत्रू पळून जातात. कोणी आपला अपमान केला तर ते आपल्या हृदयास खटकते पण कोणी मोठेपणा दिला, सत्कार केला तर ते आपल्याला प्रिय वाटते-गोड वाटते. कीर्ती आणि मान चांगला वाटतो. क्रोधाचा अग्निही थोडया वेळानंतर शांत होतो पण कामाचे भूत ज्ञान-बुद्धि सर्वांना घालवून (खाऊन) टाकते. अपकीर्तीचे भय दाखविल्यावर थोडासा प्रभाव अवश्य पडतो, परलोकाचा प्रभावही थोडासा पडतो. कारण की तो दिसत नाही. जसे वर येणाऱ्या दुधात पाणी टाकले जाते त्या प्रमाणे ज्यावेळीं भगवंताचा धांवा केला तेव्हा सर्व काही ठीक होते. पण काम-क्रोध विवेकाने दूर सरले नाहीत. मला दोन गोष्टीत खूप सहाय्यता मिळाली. भक्तिच्या मार्गात ज्यावेळी मनात काही दोष उत्पन्न होतो तेव्हा हे नाथ! हे नाथ! असा धावा करीत असे आणि ज्ञानाच्या मार्गात ***'अडंग बडंग स्वाहा'*** म्हणण्याने खूप सहायता मिळाली. या योगे संसारात जे काही सर्व दृश्यमात्र आहे त्या सर्वांचा अभाव होऊन जातो. कोणी विचारील की ही गोष्ट गीतेच्या कुठल्या श्लोकातून काढली, कारण हा मंत्र तर कुठल्याही शास्त्रात नाही—

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति॥**

(गीता १४।१९)

ज्यावेळी द्रष्टा तीन गुणांच्या अतिरिक्त अन्य कोणालाही कर्ता म्हणून पहात नाही आणि तीन्ही गुणांहून अत्यन्त पर

सच्चिदानन्दघनस्वरूप मला परमात्म्याला तत्त्वतः जाणतो, त्यावेळी तो माझ्या स्वरूपास प्राप्त होतो.

साधक पुरुष असे पाहातो की गुणच गुणांमध्ये वर्तत आहेत. भगवान म्हणतात की तो माझ्या भावास प्राप्त होतो. अन्त:कारणाच्या दृष्टीने तो पहात असतो की शरीर पृथक् आहे आणि आत्मा पृथक् आहे. चालतो तेव्हा तो त्या शरीरास इदं रूपाने पहात असतो. आकाशाप्रमाणे आपल्या स्वत:ला ब्रह्मरूपाने पहातो आणि साऱ्या ब्रह्मांडाला चारी भूतांप्रमाणे पहातो पण आकाश हे त्यांपासून निर्लिप्त आहे. ही जी साधना सांगितली ती बरोबर (सातत्याने) करीत रहावे. जितके म्हणून पदार्थ, कीट, पशु, मनुष्य आदि आहेत त्या सर्वांना परमात्म्याचे स्वरूप अथवा परमात्म्याच्या अंशाच्या रूपात पहावे. मी ही परमात्म्याचा अंश आहे, हे सर्व माझे मोठे बंधु आहेत अथवा या सर्वांमध्ये ईश्वर आहे, म्हणून हे माझे स्वामी आहेत. मी सर्वांचा सेवक आहे. आपल्याला तृणाहूनही हलके-तुच्छ मानावे. मी एक किंकर आहे, एक तृण आहे, तृणाहूनही हलका तुच्छ आहे. चैतन्य महाप्रभूचा सिद्धान्त 'तृणादपि सुनीचेन' मानला तर आपल्याला लहानाहूनलहान मानून अत्यन्त हलके बनवावे.

**भ्रातस्तिष्ठ तले तले विटपिनां ग्रामेषु भिक्षाम् अट**
**स्वच्छन्दं पिब जामुनं जलमलं चीराणि कन्थां कुरु।**
**सन्मानं कलयाति घोर गरलं नीचापमानं सुधा**
**श्रीराधामुरलीधरौ भज सखे वृन्दावनं मा त्यज॥**

कुठल्याही एकाच वृक्षाचा आश्रय करू नये, अलग-अलग (वेगवेगळ्या) वृक्षांच्या खाली राहावे, भिक्षेसाठी गावागावातून हिंडून भिक्षा मागून आणावी. ज्यावेळी तहान

लागेल तेव्हा यमुना जलाचे यथेच्छ पान करावे, चीर वस्त्रच धारण करावे (कुठल्याही प्रकारच्या चैनीची आवश्यकता नाही, शरीरास काय सजवायचे). जर कोणी सन्मान करील तर जाणावे की हे अत्यन्त जहाल विष आहे आणि जर लोकांनी अपमान केला तर त्यास अमृतस्वरूप समजावे. हे मित्रा! श्रीराधामुरलीधराचेच भजन करीत श्रीवृंदावनतच राहावे, वृंदावनास सोडून जाऊ नये.

ज्याप्रमाणे, ज्याची जशी योग्यता असेल त्याप्रमाणे नाटकांतील सोंगात त्याला त्याप्रमाणेच भूमिका दिली जाते. मुलगा सोंगा-प्रमाणेच नाटकात पित्याशी व्यवहार करतो. पिता समजतो की हा नाटकातच असे करीत आहे, त्याप्रमाणे जी भूमिका (सोंग) असेल त्या भूमिकेस अनुसरूनच सर्वांशी व्यवहार केला पाहिजे. जोपर्यत व्यवहाराचे ज्ञान राहात आहे तोपर्यंतच भूमिकेस अनुसरून वागण्याची जबाबदारी आहे. नाही तर त्यापेक्षा उच्च स्थितिमध्ये चूक झाली तरी काही दोष नाही. महात्मा पुरुषही लोकव्यवहारा प्रमाणे (सोंग) भूमिका वठवतात, त्यांच्यावर तर काही बंधन नाही. लोकमार्यादेसाठी, लोक संग्रहार्थंच ते कर्म करीत असतात. भगवान गीतेत सांगतात—

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते॥**

(गीता ३।२१)

श्रेष्ठ पुरुष जसे-जसे आचरण करतो, अन्य पुरुषही त्याप्रमाणे तसेच आचरण करतात. तो जे काही प्रमाण म्हणतो समस्त मनुष्य समुदाय त्यास अनुसरून आचरण करू लागतो.

मी कुठेही असे म्हणत नाही की ज्ञानी पुरुषाने कर्मांचा त्याग केला पाहिजे.

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत।**
**कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥**

(गीता ३ । २५)

ज्याप्रमाणे अज्ञानी (लोक)कर्मात आसक्त होऊन कर्म करतात त्याप्रमाणेच ज्ञानी पुरुषाने ही अनासक्त होऊन कर्म करावे. ते केवळ लोक संग्रहार्थच कर्म करतात.

स्वतःच मनुष्याने आपला मोठेपणा सांगावा, प्रतिष्ठा वाढवावी हे नीचकर्म आहे, आजकाल हाच आदर्श झाला आहे. भल्या माणसासाठी हे अत्यन्त नीच श्रेणीचे काम आहे. याहून नीच श्रेणीचे काम हे आहे की आपल्या मोठेपणा बरोबर दुसऱ्यांची निन्दा करणे. स्वतःला धोका दिला हे वाईट काम केले. आजकाल मतासाठी दारोदार जाऊन स्वतःची शिफारस करतात. जो कुणाचीही निन्दा करीत नाही अथवा कुणाची स्तुतिही करीत नाही तोच चांगला मनुष्य होय.

नारायण! नारायण!! नारायण!!!



# निष्कामप्रेमाने भगवान शीघ्र भेटतात

भगवंताच्या ठिकाणी श्रद्धा आणि प्रेम उत्पन्न होण्याने भगवान अतिशीघ्र प्राप्त होतात. श्रद्धा आणि भक्ती यासाठी भगवंताची प्रार्थना करा. श्रद्धापूर्वक भगवंताचे भजन करण्याने भगवान अत्यन्त शीघ्र भेटतात. श्रद्धा आणि प्रेम यासाठी चार गोष्टी पात्र आहेत—परमात्मा, महापुरुष, परलोक व शास्त्र, या सर्वांत परमात्मा श्रेष्ठ आहे. परमात्म्याच्या ठिकाणीं श्रद्धा-प्रेम उत्पन्न होण्यासाठी परमात्म्याचीच प्रार्थना केली पाहिजे. परमात्म्याची नित्य स्मृती आणि त्याच्या ठिकाणी श्रद्धा आणि प्रेम होणे आवश्यक आहे.

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः॥**

(गीता १७। ३)

हे भारत! सर्व मनुष्यांची श्रद्धा त्यांच्या अंतःकरणास अनुरूप असते. हा पुरुष श्रद्धामय आहे, म्हणून ज्या पुरुषाची जशी श्रद्धा असेल तसाच तो स्वयंही असतो.

भगवन्तानी म्हटले आहे—

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः॥**

(गीता ७। १९)

अनेक जन्मांच्या शेवटच्या जन्मात तत्त्वज्ञानाची प्राप्ती झालेला पुरुष, सर्व काही वासुदेवच आहे—या प्रकारे मला भजतो, असा महात्मा अत्यन्त दुर्लभ आहे.

भक्तिमार्गात ही गोष्ट उत्तम आहे की भगवंताचे सेवक बनून भक्ति करावी. भगवान म्हणतात—

---

प्रवचन—दिनांक १२-४-१९४६, प्रातःकाल ९ बजे, वटवृक्ष, स्वर्गाश्रम।

**समदरसी मोहि कह सब कोऊ। सेवक प्रिय अनन्यगति सोऊ॥**

गीतेत्सुद्धा ही हीच गोष्ट सांगितली आहे—

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्॥**

(गीता ९। २९)

मी सर्व भूतांच्या ठिकाणी समभावाने व्यापक आहे. मला कोणी अप्रिय नाही आणि कोणी प्रियही नाही. परन्तु जे भक्त मला प्रेमाने भजतात ते माझ्यामध्ये आहेत आणि मीही त्यांच्यामध्ये प्रत्यक्ष प्रकट आहे.

भगवान निराकार रूपाने सर्व ठिकाणी आहेत पण प्रेमामुळे प्रकट होतात. शंकर भगवान म्हणतात—

**हरि ब्यापक सर्बत्र समाना। प्रेम तें प्रगट होहिं मैं जाना॥**

बालकाण्डात जेव्हा देवता एकत्रित झाले तेव्हा शंकरांनी हा निर्णय सांगितला की ज्यांचे भगवंतावर प्रेम असते त्यांच्या संगतीने परमात्मा भेटू शकतो. चांगल्या पुरुषांच्या संगतीने भगवंताच्या ठिकाणी प्रेम उत्पन्न होते. यावाबत सत्संग सर्वश्रेष्ठ आहे, दुसरे साधन भगवंताच्या नामाचा जप हे आहे.

एकान्तात बसून रात्रंदिवस नामजप, शास्त्राध्ययन आणि स्वरूपाचे मनन करावे. ही गोष्ट स्वतंत्र आहे पण सत्संग स्वतन्त्र गोष्ट नाही. तो भगवंताच्या कृपेनेच मिळतो. कलियुगात काम, क्रोध, मद, लोभ ताण्डव नृत्य करीत आहेत.

**झूठइ लेना झूठइ देना। झूठइ भोजन झूठ चबेना॥**

भगवान म्हणतात, मला खोटे (असत्य), कपट, छल, छिद्र आवडत नाहीत. ईश्वराचे दर्शन शिक्षणाने होत नाही अथवा पूजेनेही होत नाही. हे शरीर तर केवळ हाड-मांसाचा पुतळा आहे. जर शास्त्रांस अनुसरून, गीतेच्या वचनांस अनुसरून

आचरण केले तर परमात्म्याची प्राप्ती होऊ शकते. आपण रुपये कमविण्यासाठी जितके परिश्रम करतो, कमीतकमी तितके परिश्रम तरी भगवंतासाठी केले पाहिजेत.

या जगात लक्ष्मीचे दास अधिक आहेत, भगवंताचे नाहीत. भगवान आणि लक्ष्मी यांच्यामध्ये वाद-विवाद झाला असता लक्ष्मीने सांगितले की दास तर माझेच अधिक असतील, मोजून पहा. सत्ययुगात, द्वापारात सर्वभगवंताचे भक्त होते, लक्ष्मी येऊन त्यांच्या पायावर पडत होती. ईश्वराच्या भक्तीमुळे त्यांचे आचरण आपोआप शुद्ध होत असे. दुःख, क्लेश जवळ येत नव्हते आणि लक्ष्मी येऊन त्यांच्या पायांवर पडत होती.

**खल कामादि निकट नहिं जाहीं । बसइ भगति जाके उर माहीं ॥**
**गरल सुधासम अरि हित होई । तेहि मनि बिनु सुख पाव न कोई ॥**
**राम भगति मनि उर बस जाकें । दुख लवलेस न सपनेहुँ ताकें ॥**

ज्याच्या हृदयात भक्ति राहाते त्याच्यासाठी विषही अमृत बनते. लौकिक ऐश्वर्य धुळी समान दिसू लागते. काम, क्रोध, मद, लोभ क्लेश आदि भक्तिरूपी मण्याजवळ येऊच शकत नाहीत. जसा अंध:कार सूर्यासमोर येऊ शकत नाही, त्याप्रमाणेच भक्तीरूपी मण्याच्या प्रकाशासमोर हे बिलकुल जाऊ शकत नाहीत. म्हणून ईश्वराच्या भक्तीला आपल्या मनात स्थापन केले पाहिजे ईश्वराच्या भक्तीचा महिमा खूप वर्णन केला गेला आहे. जो खरा प्रेमी असेल त्याला सर्व वस्तु हस्तगतच असतात, त्याला दुर्लभ काहीच नाही. त्याला गीतेत भगवंतानी ज्ञानी भक्त म्हटले आहे. आनन्द भक्ती करणारा ज्ञानी श्रेष्ठ आहे. भगवान म्हणतात की ज्ञानी भक्ताला मी अतिशय प्रिय आहे आणि ज्ञानी भक्त मला अतिशय प्रिय आहे.

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः॥**

(गीता ७।१७)

भक्त-ज्ञानी असा असावयास हवा की भगवंतावर त्याचे पूर्ण प्रेम असावे. सर्व कांचन आणि कामिनीवर प्रेम करतात.

**जैसा हेत हरामसे वैसा हरिसे होय।**
**चला जाय वैकुण्ठको पला न पकड़े कोय॥**
**कामिहि नारि पिआरि जिमि लोभिहि प्रिय जिमि दाम।**
**तिमि रघुनाथ निरंतर प्रिय लागहु मोहि राम॥**

भगवंताच्या ठिकाणी या प्रकारचे प्रेम असायला हवे. एका बाजूला रुपया आणि एका बाजूला जर भगवान असतील तर भगवंतासमोर रुपये धुळीसारखे तुच्छ समजावे.

एक भगवंताचा निष्काम प्रेमी होता. लाखो रुपये त्याच्या जवळ होते. रात्रंदिवस भगवंताचे नाम जपत असे. मुलाला प्लेग झाला. मुलाला वैद्यांना, डॉक्टरांना दाखवले. डॉक्टरांनी हात टेकले. कुणी तरी सांगितले की अमुक ऋषीच्या धुनीची राख जर मिळाली (दिली गेली) तर मुलगा ठीक होऊ शकेल हा एकच उपाय आहे. लोक त्याऋषीजवळ गेले, धुनीची राख मागितली तर ते मुनि हसले. त्यांनी सांगितले की काय शेटजीने माझ्याजवळ धाडले आहे. लोक म्हणाले, हां! ऋषीनी सांगितले की तुम्ही जाऊन त्यांना सांगा की शेटजीनी आपली माळ त्याच्यावर ठेवली तर मुलगा ठीक होऊन जाईल. शेटजी म्हणाले की ऋषींच्या मनात नाही. ऋषि म्हणाले की आपलेही तर मन नाही. थोडया वेळाने मुलगा मेला. लोक म्हणाले की महाराज, मुलगा मेला आहे. तर म्हणाले की घेऊन जा त्याला. संसारातील प्रेम काढून

घेतले पाहिजे आणि भगवंतावर प्रेम केले पाहिजे. भगवान म्हणतात की मी अनन्यभक्तीने प्राप्त होतो. वेदाने, यज्ञाने ज्ञानाने नव्हे. केवळ अनन्यभक्तीने-प्रेमाने मी भेटू शकतो. केवळ मात्र प्रेम उत्पन्न झाले असेल तर मी दर्शन देतो. आपले प्रेम विखुरलेले आहे. म्हणजेच शरीर, मान, रुपये यात आहे. या सर्वांना ठोकरून मन भगवंताच्या ठिकाणी लावावे. भगवंताचे मूल्य आत्मा आहे. जर आपण भगवंतास खरेदी करण्याची इच्छा करीत असाल तर तो आपला मूर्खपणा आहे. भगवान रुपये पहात नाहीत, प्रेम पहातात. जो रुपयांच्या घमेंडीत असतो त्याची ती घमेंड भगवान नष्ट करून टाकतात. मूल्यतर परीसाचेही होऊ शकत नाही तर भगवंताचे कसे होऊ शकेल? भगवंताची प्राप्ती, बुद्धीने, तर्काने अथवा बळानेही होत नाही. पूर्ण जीव ओवाळून टाकल्यावर संसाराविषयी वैराग्य उत्पन्न झाल्यावर भगवान भेटू शकतात. जे काही खायला प्यायला मिळेल त्यात आनन्द, जेथे कुठेही पडावे तेथे झोप यावी, रात्र काढायची असते आणखी काय पाहिजे? आपल्या शरीराचा निर्वाह कमीत कमी पैशात केला पाहिजे बाकीचे पैसे वाचवून दुःखी गरीबांची सेवा केली पाहिजे.

**महीरम्या शय्या विपुलमुपधानं भुजलता**
**वितानं चाकाशं व्यजनमनुकूलोऽयमनिलः ।**
**स्फुरद्दीपश्चन्द्रो विरतिवनितासङ्गमुदितः**
**सुखं शान्तश्शेते मुनिस्तनुभूतिर्नृप इव ॥**

ज्याची सुंदर शय्या भूमि, उशि भुजा, आकाश छत, अनुकूल वायु पंखा, चन्द्रमा हाच प्रकाशमान दीपक आहे, विरक्तीरूपी स्त्रीचा संग आहे तो मुनि ऐश्वर्यवान राजाप्रमाणे सुखशान्तीपूर्वक शयन करतो.

ज्याप्रमाणे दधिचि ऋषी ध्यानात मग्न होते. इन्द्र येऊन बसून राहिला. त्यांनी डोळे उघडल्यावर इंद्राने प्रार्थना केली की आपल्याप्रमाणे मला ही ध्यान साधावे, तेव्हा ऋषीनी उत्तर दिले कि ज्याप्रकारे तू इन्द्रासनावर बसून इन्द्राणीचा भोग घेतोस त्याप्रकारेच एक कुत्रा अथवा डुक्करही भोग घेतात. आपण सर्व ऐश्वर्यास मूत्राप्रमाणे मानले पाहिजे. त्याचप्रमाणे सर्व त्रैलोक्यातील ऐश्वर्यासंबंधी आसक्ती वृत्ती नष्ट झाली पाहिजे. ज्या प्रकारे मलमूत्रावरून वृत्ती उठून जाते त्याप्रमाणे व्हावयास हवे. या सर्वांपासून तर दूर राहिलेच पाहिजे. भगवान म्हणतात की हा मूर्ख माझ्या स्वरूपास कसा जाणेल, हा तर मळातच रमत राहीला आहे. यात मूर्ख असतात तेच रमतात, विवेकी मात्र रमत नाहीत. जोपर्यत आपण ऐश्वर्यात लिप्त आहोत तोपर्यंत आपणास ईश्वराची प्राप्ती होऊ शकणार नाही. शरीराच्या निर्वाहासाठी जे काही सुके-कोरडे मिळेल ते पर्याप्त आहे.

**कबिरा मन तो एक है चाहे जहाँ लगाय।**
**चाहे हरिकी भक्ति कर चाहे विषय कमांय॥**

भगवान म्हणतात की जो माझ्या शिवाय जगूंच शकत नाही, जो सर्व इन्द्रियांनी माझ्याठिकाणीच रमण करतो तोच भक्त होय.

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते॥**

(गीता १०।१०)

ज्यांचे चित्त निरंतर माझ्या ठिकाणी जडलेले आहे आणि जे मला भजतात त्यांना मी हे दिव्यज्ञान देतो की ज्या योगे त्यांना ळगेच माझी प्राप्ती होऊन जाते.



# भक्तिची आवश्यकता

सामान्य लोकासाठी भक्तिचा मार्ग सुगम आहे आणि ज्ञानाचा मार्ग कठीण आहे. परंतु ज्यांनी ज्ञानाचे स्वरूप जाणून घेतले असेल त्यांच्यासाठी तोच सुगम आहे. भक्तीचा सिद्धान्तच श्रेष्ठ आहे असे म्हणत असतांनाही ज्ञानाचा सिद्धान्त मला कठीण वाटत नाही, पण इतरांना तो कठीण वाटत असतो.

बाळपणी मी भगवन्ताचे चित्र समोर ठेवून त्याच्या मुखारविन्दाच्या ठिकाणी ध्यान धरून कल्पना करीत असे की चित्र हसत आहे म्हणजेच त्या ठिकाणी कल्पनेने मी क्रिया पहात असे की यातून भगवान प्रकट होतील. ध्यान करण्याने माझे मन प्रसन्न राहू लागले. तर्काने पाहिले तर चित्र म्हणजे केवळ कागद आणि काच आहे परंतु श्रद्धा फार महत्त्वांची गोष्ट आहे. मूर्तीपूजेची व्यवस्था फार विचारपूर्वक केली गेली आहे. मूर्ती मग ती वाटल्यास कागदाची, चांदीची, अथवा लोखंडाची कुठल्याही पदार्थाची असली तर श्रद्धेने साक्षात भगवान प्रकट होत असतात. मी साधूंचा आणि अन्य महात्मा लोकांचा असा अनेक व्यक्तींचा संग केला. तर्कशील असल्याने माझी श्रद्धा फारच अधिक होती कारण की ते समजत होते की हा साधक आहे. ज्या शेकडो साधूंना मी चांगले म्हणून समजतो त्यांतील फक्त दोन-चार जणांनाच परमात्मप्राप्ती झालेली आहे. जी लक्षणे गीतेमध्ये, वेदामध्ये लिहिली गेली आहेत ती जर कुणाच्या ठिकाणी सोळा आणे मनात विचार केल्यावर मला दिसून आली तर मी त्यास साधु मानतो. वास्तविक जे खरे साधु आहेत ते या कसोटी पासून लपून राहू शकतात. जर या युगात असे होणे असम्भव आहे असा

प्रवचन—दिनांक १२-४-१९४६, प्रातःकाल ९ बजे, वटवृक्ष, स्वर्गाश्रम.

माझा निश्चय झाला असता तर माझी प्रकृती जैनांच्याप्रमाणे झाली असती. ईश्वराची दया सर्वांवरच आहे पण मी जेव्हा माझ्या परिश्रमांच्या संबंधी विचार करतो तेव्हा मला तर काहीच परिश्रम झालेले दिसून येत नाहीत. पण भगवंताची जितकी दया माझ्यावर आहे असे मला जाणवत आहे तितकी दुसऱ्या कुणावर क्वचित्च असेल असे मला अनुभवास येत असते, जणुं माझ्यावर भगवंताची फारच दया आहे.

बालपणी मी वेदान्ताचे ग्रंथ योगवासिष्ठ, विचारसागर, पंचदशी आदि पाहिले होते परन्तु स्वामी शंकराचार्यांच्या अद्वैतवादावर खूपच श्रद्धा होती. पण परमात्म्याची प्राप्ती झाल्यावरही जर असत्य, कपट, अभिमान आदि शिल्लक राहात असतील तर अशी पुस्तके मी वाचू इच्छित नाही. उदाहरणार्थ विचारसागर आणि पंचदशी या ग्रंथाना मी गीताप्रेसमध्ये येऊही देत नाही.

गीतेवर भक्तिमार्गीय जितक्या म्हणून टीका आहेत त्या जितक्या जास्तीत जास्त छापल्या जातील तितके चांगले होईल. ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग हे दोन्ही मला तर गाडीच्या दोन चाकांच्या सारखेच दिसतात. व्याख्यान देते वेळी मी ज्ञानी लोकांसाठी ज्ञानी आणि भक्तांसाठी भक्त बनून जातो. माझ्या बाबतीत तिळमात्र शक्यता नाही की मी या दोहोपैकी कुठल्याही एकाचे खंडण करू शकेन. शास्त्रात ज्ञानमार्गास जितके कठीण म्हणून सांगितले गेले आहे तितका तो माझ्या दृष्टीला कठीण म्हणून अनुभवास येत नाही. पण मी सामुदायिक दृष्टीकोनातून असे म्हणतो की जर भगवंताची माझ्यावर विशेष कृपा झाली नसती तर मी नास्तिक झालो असतो. मी वेदान्तास वाईट समजत नाही. मी मर्यादापालनाचा अत्यंत पक्षपाती आहे. जेथे मर्यादा रक्षणात कमतरता जाणवते त्या गोष्टींचा मी तात्काळ त्याग

करतो-ती ळगेच फेकून देईळ. मी मर्यादाप्रिय आहे. मर्यादेचा भक्त आहे. ज्या पुरुषांच्या विषयी माझ्या मनात श्रद्धा उत्पन्न झाली, त्याच्याशी श्रद्धेमुळे व्यवहार उत्तम होणे आवश्यक आहे पण ही माझी उणीव-कमतरता आहे. नित्य अग्निहोत्र, यज्ञ, दान आदि केले पाहिजे. सिद्धान्त म्हणून मला हे मान्य आहे पण मी हे करीत नाही ही माझी कमतरता आहे. या प्रकारेच शास्त्रात ज्या गोष्टी सांगितल्या गेल्या आहेत त्या बाबतीत माझ्याकडून आवश्यक इतक्या उच्च दर्जाचा व्यवहार होत नाही ही पण माझी उणीव आहे. मी त्या गोष्टींचा आदर करतो पण फक्त वाणीनेच करतो, कार्यरूपाने करीत नाही. हे पण मला कमीपणाचे आहे हे मी जाणून घेतले पाहिजे.

नास्तिकतेमुळे जो दम्भ असतो तो तामसी आहे आणि मानसन्मान प्रतिष्ठा यामुळे जो दम्भ आढळतो तो राजसी आहे. मी नास्तिकता असणारांना अधिक वाईट समजतो.

ज्याप्रमाणे एखादा मनुष्य निर्गुणाची उपासना करीत असतां जबरदस्तीने त्याचा कान पकडून त्याला सगुणाकडे लावावे त्या प्रकारे भगवंताच्या विशेष दयेमुळे मी वाचलो आहे, माझा बचाव झाला आहे. ज्ञानमार्गाची मी निन्दा करीत नाही पण ज्ञानमार्गाने जात असता पतन व्हावे हे मला योग्य वाटत नाही. यास थोडे हेही कारण असू शकेल की काळानुसार भक्तिमार्गाची (अधिक) आवश्यकता आहे आणि ज्ञानमार्ग तर भगवंताने एक दुसरा मार्ग म्हणून उपलब्ध करून ठेवला आहे. ज्याप्रमाणे दोन रस्ते जात तर असतात एकाच दिशेने आणि एखादा आंधळा एका रस्त्याने जात असतांना तो एखाद्या विहिरीत अथवा खड्ड्यात वाटेत पडण्याची शक्यता आहे. असे बघून प्रभू त्याची काठी पकडून त्यास दुसऱ्या मार्गावर आणून सोडतात तसे

हे समजावे. सत्यभाषण, मर्यादा आणि निष्कामभाव-ह्या तीन्ही गोष्टी माझ्या प्रकृतिस अनुसरून मला जास्त अनुकूल वाटतात. पाहिजे तर कुणी ज्ञानसिद्धान्तानुसार वागो अथवा भक्तिच्या सिद्धान्ताचे अनुसरण करो, ह्या तीन्ही गोष्टी आवश्यक आहेत. जर आचरण खराब-वाईट असेल तर या तीन्ही पैकी कुठली तरी एक गोष्ट दुर्लक्षित झाली आहे असे जाणावे. निष्कामभाव असेल तर ठीक आहे पण जर नसेल तर मग काहीच नाही असे जाणावे. निष्काम भाव आणि उत्तम आचरण फार मूल्यवान गोष्टी आहेत. निष्कामभावामध्ये वैराग्याचा अंतर्भाव होत नाही कां? निष्कामभावात वैराग्य नाही असे थोडेच असते?

वैराग्याच्या अंतर्गत निष्कामभाव येतोच. निष्काम भाव कार्य आहे आणि वैराग्य फळ आहे. वैराग्य ही निष्कामापासून दुसरी पायरी आहे. आसक्तीच्या त्यागाच्या अंतर्गत फलाचा त्याग आहे. एकाच श्लोकात भक्ती आणि ज्ञान या दोन्ही गोष्टींचे रहस्य दिले गेले आहे. सिद्ध अवस्थेत आसक्तीचा अभाव दाखविला गेला या प्रकारे ती पहिली पायरी आहे. म्हणूनच असे सांगितले आहे की फल आणि आसक्ती दोन्हीचा त्याग करणे आवश्यक आहे, आणि दोन्ही एक दुसऱ्याच्या अंतर्गतच आहेत.

मी ज्ञानाचे जितके वर्णन करतो त्याचे पायरी दर पायरीने साधन करतो, परन्तु भक्ती ईश्वराच्या विशेष कृपेचे फळ आहे. ज्ञान तर मनुष्याची स्वत:ची बुद्धी आहे आणि भक्ती ईश्वराची देणगी आहे. भक्तीचा विषय ईश्वरी प्रेरणेमुळे होतो आणि ज्ञानाचा विषय स्वाभाविक आहे. ही ईश्वराच्या विशेष कृपेची गोष्ट आहे. एक प्राकृतिक गोष्ट आहे आणि दुसरी भक्ती ही परमात्म्याच्या विशेष कृपेची गोष्ट आहे.

ईश्वराच्या भक्तीच्या विषयातच सगुणभक्तीचा विषय येतो. त्या

विषयात कुणी आपल्याला अधिक ज्ञान आहे असे म्हणू लागला की मळा हसू येते. मी तसे बोलत अथवा दाखवत नाही पण हसू तर येतेच; कारण मला ती व्यक्ती खरोखरीच्या तत्त्वास जाणत आहे असे वाटत नाही, त्याच्या आसपास घोटाळत आहे असे वाटते. त्या व्यक्तीचा अपमान होऊ नये म्हणून मी खुलासा करीत नाही. जो असे म्हणतो की भगवंताचे ध्यान-भजन ठीक जमत आहे तो मूर्ख आहे. पण त्याला मात्र मी म्हणतो की ठीक आहे.

जर कोणी साधक साधन करीत असेल तर त्यात अनुचित कशा प्रकारे असेल? कुठल्याही महापुरुषास त्याच्या भगवत् प्राप्तीविषयी प्रश्न करणे अनुचित आहे. जर आपली त्यांच्या ठिकाणी श्रद्धा असेल तर हा प्रश्न उपस्थितच होत नाही. श्रद्धा आहे आणि परीक्षा पहाण्यासाठी जर प्रश्न केला जाईल तर ते त्यांचा अपमान करण्यासारखे आहे. अशा प्रकारे एखाद्या मूर्खाने जर सांगितले तर त्यावरून असे कळून येते की तुमचे कार्य सिद्ध झालेले नाही; म्हणून ही गोष्ट प्रश्न विचारण्यालायक नाही. मी तर त्याला असेच उत्तर देईन की या प्रश्नाचे उत्तर देण्यास मी लाचार आहे. जो मनुष्य कित्येक वर्ष त्या महापुरुषाजवळ राहीला तोही असा प्रश्न विचारण्यास अधिकारी नाही. जर कोणी परमात्म्याची प्राप्ती झालेला पुरुष असेल, त्याच्या अनुकूल कुणी वागत असेल आणि अशाने जर त्यास विचारले तर ते विचारणे योग्य आहे की नाही? तर नाही असेच उत्तर द्यावे लागते. असा प्रश्न करणे त्याचे कर्तव्य नाही. त्या महापुरुषास आवश्यकता वाटली तर तो आपण स्वतःच सर्व सांगेल.

परमात्म्याची प्राप्ती करून घेऊनच येथून परत जावयाचे आहे. राहण्यासाठीच गीता भवन निर्माण झाले आहे. वाटल्यास बारा महिने, अथवा आजीवन वानप्रस्थाश्रमात राहा. आता गोष्ट

राहिली भोजनाची जर जास्त व्यक्ती असतील तर व्यवस्था केली जाईल अन्यथा आपापली व्यवस्था करावी. भोजनाची व्यवस्था तर करावीच लागते, मग कुठेही असो, येथे तर काही आपत्तीच नाही. बरे अशी गोष्टही नाही की दुसरी जागा मिळत आहे आणि येथे कुणी हिरावून घेत आहे. ज्याची इच्छा असेल तो येथे राहू शकतो. एकेक माणूस एकेक खोली घेऊन जरी राहील तरी सत्संगानंतर राहू शकतात. खूप एकान्तात राहून नऊ महिन्यासाठी भजन-ध्यान करा. मनात दृढविश्वास बाळगला पाहिजे की भगवंताची भेट घेऊनच येथून जाईन. तीन महिन्याच्या सत्संगाचा फायदा तर त्यास मिळेलच, त्याचे काहीही वाईट होणार नाही. राहाण्याच्या जागेच्या कमतरतेची पूर्ती ही आता झालेली आहे. लहान मोठ्या साठ खोल्या आहेत. पन्नास माणसांची तर पूर्ण व्यवस्था आहे. गृहस्थ मनुष्य जर वानप्रस्थाश्रमात राहून आपले जीवन परमात्म्याच्या भजनात-ध्यानात घालविण्याची इच्छा करीत असेल तर त्याच्यासाठी ही सुगमता आहे. त्याला प्रथम एकावर्षापुरती सूट दिली जाईल कारण त्याचे बोलणे, चालणे त्याची राहाणी, त्याचे चारित्र्य आदि पाहिले जाईल. आमचे तर ध्येय हे आहे की परमात्म्याचे भजन-ध्यान आदि करण्यासाठी हे भवन निर्माण झाले आहे ऐष-आराम, भोग यासाठी नाही. ऐष-आरामाची इच्छा असेल तर ते अन्यत्र दुसरीकडे जाऊ शकतात. हे भवन तर भजन ध्यान करणाऱ्या गृहस्थांसाठी आहे. तीन गोष्टी एकत्रित आल्या की खरे अमृत निर्माण होते, हे तर अमृतच आहे. असे सांगितले जाते की न मागता जी गोष्ट प्राप्त होते ती अमृत असते. या वास्तुसाठी जो पैसा खर्च झाला आहे तो अमृतमय आहे. न मागता पैसे आलेले आहेत आणि आम्ही कुणी ही याचना न करता, मागणी न करता घोषणा करीत

आहोत तीही अमृतमय आहे. या वास्तूत राहून जो भजन-ध्यान करील त्याच्यासाठी तिसरे अमृत उपलब्ध आहे. एकान्त पवित्र देश, शुद्ध भूमि आणि राहाण्याचे स्थानही शुद्धच आहे. अमृताचे फल अमृत आहे आणि अमृत भगवान आहेत. समता अमृत आहे. खाणावळी चे अन्न (स्वयंपाक) जर विषमता न करता बनविले गेले तर तेही अमृत आहे. ते गृहस्थ, साधु, मालक अथवा नोकर ज्याची इच्छा असेल तो कुणीही घेऊन जाऊ शकतो. साधु-संन्यासी यांच्यासाठी विना मूल्य अमृत आहे आणि जे कोणी पैसे देऊ शकतात त्यांच्यासाठी पैसे देऊन अमृत आहे पैशानी घेतलेली वस्तु आपली आहे असे समजू नका. न्याय हेच अमृत आहे.

सर्वांना माझी हीच एक प्रार्थना आहे की माझे शरीर शान्त झाल्यावरही हा सत्संगाचा उपक्रम आपण चालू ठेवलात तर फार उत्तम होईल. भवन बनविण्याचे सार्थकही तेव्हाच होईल जेव्हा ते ध्यान-सत्संग यासाठी उपयोगात येईल. हे स्थान हा वटवृक्ष परमात्म्याच्या कृपेने बनलेली आहेत. जितके दिवस या गोष्टी कायम राहातील, आपला उपक्रम चालू राहील तितके फार चांगले आहे. भविष्यातील कोण सांगू शकतो? पण माझी प्रार्थना तर हीच आहे की जगातील विद्यमान व्यक्तीनी यथाशक्ती या साठी प्रयत्न करावा. या वास्तूत बसून भजन-ध्यान आणि आपापसात भगवत्चर्चा, सत्संग ह्या तीन गोष्टी या ठिकाणी कायम होत राहातील तर फारच उत्तम होईल. जप, ध्यान, सत्संग या गोष्टी येथे आपल्याला न मागता मिळत आहेत. प्रत्येक माणसाने हे लक्षात घेणे आवश्यक आहे की सत्संगाचा कार्यक्रम लोकासाठी अत्यंत हितकारक आहे. जे यात सामील होतात त्यांचा तर खूपच फायदा आहे पण जे पुस्तकांतून ऐकतात,

वाचतात त्यांनाही लाभ होईल. जी व्यक्ती तनमनाने यांत मग्न होईल त्या व्यक्तीस इतरापेक्षा अधिकलाभ होईल. येथे तीसरी वस्तू जी धन तिची आवश्यकता नाही. तन-मन लावण्याची आवश्यकता आहे. सर्वांनी या दोन गोष्टी द्याव्या अशी प्रेरणा आहे. जर स्वत: शरीराने येऊ शकत नसाल तर घर बसल्या मन तर देऊ शकता. प्रत्येक मनुष्याने आपल्या व्यक्तिगत कल्याणासाठी, आत्मकल्याणासाठी तन, मन, धन सर्व अर्पण करणे आवश्यक आहे. भगवंताकडे सन्मुख होण्यात जी वस्तु उपयोगी ठरत नसेल ती काहीही कामाची नाही. जो भगवंताच्या कामी आपल्याला सहायता करतो तोच आपला आहे. ज्याप्रमाणे या जगांतील धन आपले नाही त्याप्रमाणे जी वस्तु भगवन् सम्मुख करण्यास आपल्याला सहाय्य करीत नाही ती काहीही कामाची नाही. निरुपयोगी समजावी.

भगवदभावांचा-भगवत भक्तीचा प्रचार जो करतो तो सर्वात उच्चकोटीचा भक्त आहे. ज्यावेळी मी गीतेच्या अ० १८ मधील ६८-६९ हे श्लोक वाचले तेव्हा मला फार बरे वाटले. भगवंतानी त्यांत येथपर्यंत सांगितले आहे की तुझा-माझा जो हा संवाद आहे त्याचा या जगात जो कोणी प्रचार करील त्याच्या सारखा माझा प्रिय भक्त कोणी झाला नाही, पुढे होणार नाही आणि वर्तमान काळीही नाही.

वाल्मीकि रामायणामध्ये हनुमन्तास भगवंतानी सांगितले आहे की मी तुझा ऋणी आहे. हनुमंताने भगवंताच्या आज्ञेचे पालन केले, त्यावेळी दुसरा कोणी हनुमानाप्रमाणे नव्हता म्हणून भगवंतांना सांगावे लागले की मी ऋणी आहे आणि उऋण होण्याची इच्छाही मी करीत नाही. गीता आणि रामायण एकच आहेत. ते रामचरित्र आहे हे कृष्णचरित्र आहे, ते त्रेतायुग होते

हे द्वापरयुग आहे. गीता अलौकिक ग्रन्थ आहे. पुस्तके विकून, वाटून, व्याख्याने ऐकून आणि देऊन ज्या प्रकारे शक्य असेल त्या प्रकारे गीतेचा प्रचार केला पाहिजे. भगवंतांनी केव्हाही कुठल्याही भक्ताबद्दल असे म्हटलेले नाही की असा भक्त कधी झाला नाही किंवा होणार नाही. गीता प्रचारकाकरिता मात्र भगवान म्हणतात की या प्रकारचा भक्त सध्या नाही, पूर्वी झाला नाही आणि पुढेही होणार नाही. ही परम सेवा आहे कारण ही परमात्म्याची सेवा आहे. आपण निष्काम भावाने तन, मन, धन आणि समुदायाने सेवा केली पाहिजे. भगवंताचे सर्वांपेक्षा अधिक प्रिय बनावयाचे असेल तर हेच करा. जी व्यक्ती माझे सांगणे ऐकते ती व्यक्ती मला जितकी प्रिय वाटते तितके मनुष्यात दुसरे कोणी प्रिय वाटू शकत नाही. त्यांतून परमात्मा तर सर्वांच्या बाबतीत दयाळू आहेत. स्त्री-पुत्र आदि अनुकूल नसतील तर ते प्रिय नाहीत. रामायणात भगवंतानी हेच सांगितले आहे—

**सोइ सेवक प्रियतम मम सोई। मम अनुसासन मानै जोई॥**

तोच माझा सेवक आणि प्रियतम आहे जो माझी आज्ञा मानतो. आज्ञा पालन करणारापेक्षा अनुकूल वागणारा अधिक प्रिय आहे. एक प्रिय आहे, दुसरा अधिक प्रियतर आणि त्याहून तिसरा अधिक प्रियतम आहे. त्याहून अधिक असणारासाठी दुसरा कुठलाही शब्द नाही. भगवंतांनी प्रियतम म्हटले आहे. भगवंताच्या शरीराची सेवा करणारा प्रियतम नाही परंतु त्यांच्या अनुकूल वागणारा प्रियतम आहे. भगवंताच्या इच्छेला अनुसरून जो काम करतो त्याच्याहून अधिक प्रिय भगवंतास इतर कुणीही होऊ शकत नाही.

आपणही गीता आणि रामायणाच्या प्रचारासाठी प्रयत्न केले पाहिजेत. ते फार उच्चकोटीचे ग्रन्थ आहेत, त्यांचा प्रचार केला पाहिजे. त्यात ही गीता परमात्म्याच्या मुखातून निघाली आहे.

**गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रसंग्रहैः।**
**या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिःसृता॥**

(महा० भीष्म० ४३।१)

'गीतेचेच उत्तम प्रकारे श्रवण, कीर्तन, पठण-पाठण, मनन आणि धारण केले पाहिजे. अन्य शास्त्रांच्या संग्रहाची काय आवश्यकता आहे? कारण गीता स्वतः पद्मनाभ भगवंताच्या साक्षात मुखकमलांतून निघालेली आहे.'

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि॥**

(गीता १८।६९)

त्याच्याहून अधिक माझे प्रिय कार्य करणारा मनुष्यामध्ये कोणीही नाही, तसेच पृथ्वीमध्येही त्याच्याहून मला अधिक प्रिय दूसरा कोणी भविष्यातही होणारही नाही.

जो या मार्गावर चालतो त्याचेच जीवन धन्य आहे, त्याचेच माता-पिता धन्य आहेत. आज तुलसीदास नाहीत पण त्यांचे रामायण, विनयपत्रिका हे ग्रन्थ विद्यमान आहेत. त्यांच्या पुस्तकांच्यामुळे उपदेशामुळे किती मनुष्यांचे कल्याण होऊन गेले आहे हे सांगता येणे शक्य नाही. जर आपणही गीतेचा प्रचार केला तर तुलसीदासच नव्हे तर त्यांच्यापेक्षाही उच्च कोटीचे आपण बनू शकतो.

परमात्म्याची प्राप्ती तर फार मोठी गोष्ट नाही. तुलसीदासानी सांगितले आहे की रामाहूनही रामाचा दास श्रेष्ठ आहे. कारण भगवान स्वतः आपल्या भक्तिचा तितका प्रचार करू शकत नाहीत जितका प्रचार त्यांचा दास करू शकतो. कारण भगवान तर सिद्ध आहेत आणि दास साधक आहे. जर जगात भक्त झाले नसते तर जगात त्यांचा भगवंताचा इतका नावलौकिक झालाच नसता.

आज तुम्हा लोकांना सिद्धान्ताची, तत्त्वाची मार्मिक आणि दार्शनिक गोष्ट सांगितली गेली आहे, महात्म्यांचे रहस्य सांगितले गेले आहे. जो भगवंतास अनुकूल असतो त्याचा तर उद्धार होऊनच जातो शिवाय त्याच्या कृपेने इतर हजारो-लाखो लोकांचाही उद्धार होऊ शकतो. म्हणून ईश्वरास अनुकूल होण्याइतकी आणि त्याहून, अधिक श्रेष्ठ दुसरे काहीही नाही. आपला उद्धार तर ईश्वर प्राप्त पुरुषांशी अनुकूल होण्यामुळेही होऊ शकतो परन्तु परमेश्वरास अनुकूल झाल्यानंतर सर्व जगाचा उद्धार तो करू शकतो. परमात्म्याच्या अनुकूल झाल्यावर चिन्तेचे काही कारणच उरत नाही. असे पुरुष या जगात फार कमी आहेत. महात्मा अथवा परमात्म्याच्या अनुकूल होऊन जाणे अत्यंत सौभाग्याची गोष्ट आहे. जो परमात्म्याच्या अनुकूल झाला त्याने एका प्रकाराने परमात्म्याला विकतच घेतले आहे. भगवंतास ज्याने आपले सर्वस्व अर्पण केले त्याने भगवंताचेच सर्वस्व घेतलेले असते. कारण भगवान तर प्रेमाचे भुकेले आहेत. म्हणून जे काही भगवंताचे आहे ते आमचे आहे आणि जे आमचे आहे ते भगवंताचे आहे. भगवंताचा आत्मा त्याचा होऊन जातो आणि त्याचा आत्मा भगवंताचा होतो. ही एकताच सर्वश्रेष्ठ वस्तु आहे. ऐश्वर्य आदि तर त्याच्या अंतर्गत आहे. स्वार्थाच्या दृष्टीनेही आपला आत्मा अल्प आहे आणि भगवंताचा विशाल आहे. ज्यावेळी स्वत:भगवान बोलावीत असतील तेव्हा तर आपण तात्काळ त्यांना सामिल व्हावयास हवे. भक्तिच्या मार्गात व्दैत आणि ज्ञानात अव्दैत एकच राहाते. ज्ञानमार्गात तर एकच स्वरूप असते भक्तीमध्ये स्वरूप अलग असूनही एकता राहाते, अत्यन्त मित्रता राहाते. अशा मित्राचा शोध आपणही घेतच आहोत की ज्याचे सर्वस्व आपले आणि आपले सर्वस्व त्याचे होऊन जाईल.

भगवंताचीही हीच इच्छा आहे आणि आपलीही हीच इच्छा आहे. तर दोघांचा सौदा पटवून टाका. तुम्ही माझ्यासाठी भगवंताची प्रार्थना करा आणि मी तुमची सहायता करीन, तुम्हाला मदत करीन कारण भगवंताची भेट झाल्यावर पहिला नम्बर तर आमचाच असेल. तुमचा उद्धार होण्याची गोष्ट तर अगदी सामान्य आहे. मनाच्या प्रतिकूल वागणारे तर शेकडो मिळाले पण अनुकूल वागणारा कोणी मिळाला नाही. भगवान तर भेटले असतील? पण तेही तर प्रतिकूलच आहेत जर अनुकूल असते तर फारच लवकर आपला उद्धार झाला असता. तुम्ही माझ्या मनाच्या अनुकूल नाही ही गोष्ट मी कशी सांगू शकतो, कारण मीही तर दुसऱ्यांच्या अनुकूल नाही.



# प्रत्येक वेळी आनंदात मुग्ध होऊन राहावे

आमची अशा व्यक्तीशी गांठभेट व्हावी की जी भगवंताहून अधिक बलवान असेल. तसे झाले तर भगवान वाटल्यास न आले तरी चालेल. भगवंतानी मला बोलावले तर मी लगेच जाईन पण मी बोलावले तर भगवंतानी यावे असे सामर्थ्य माझ्या. ठिकाणी नाही.

**प्रश्न**—आपल्याला स्वप्नात दर्शन झाले तर आम्हाला स्वप्नातच दर्शन घडवा?

**उत्तर**—स्वप्नात दर्शन होण्याचा उपाय तर सांगितलाच आहे की माळेने जप करता-करता झोपा, कधीही एखादे दिवशी दर्शन होऊ शकते.

**प्रश्न**—एक वेळ स्वप्नातच दर्शन घडवा.

**उत्तर**—दर्शन होईल तर केवळ प्रेमामुळेच होईल. स्वप्नात दर्शन होणे घडवणे आमच्या हातात नाही. भगवंताजवळ हेच मागावे की सतत दर्शन होतच राहावे.

**प्रश्न**—भगवंतास काय सांगितले पाहिजे?

**उत्तर**—भगवंताचा प्रभाव, त्यांचे प्रेम या गोष्टींच्यामुळे भगवान लवकर भेटतात. गोपींच्या प्रेमासंबंधी गोष्टी सांगण्यातही अडथळा येतो कारण हा कलियुगाचा काळ आहे. सर्वात श्रेष्ठ गोष्ट प्रेम ही आहे. आपापसात प्रेम उत्पन्न होईल तर त्यामुळेही भगवान भेटतील. गोपींच्या मध्ये भगवंतामुळेच आपापसात प्रेम होते. कुणी मनुष्य भोगांच्यामुळे प्रेम करतो तेव्हा त्याचे ते प्रेम वास्तविक भोगांवर आहे असे समजले जाते. भगवंतासाठी आपापसात प्रेम केले तर त्याच्या फलस्वरूप भगवान भेटतील.

**प्रश्न**—आपापसात प्रेम पहिल्यासारखे दिसून येत नाही?

**उत्तर**—आता तर मला पाहूनही प्रेम दिसून येत नाही. आपापसातील प्रेम खूप वाढवावे. एक दुसऱ्यास पाहून शरीरावर रोमांच येऊ लागावे, अश्रुपात व्हावा. असे प्रेम उत्पन्न व्हावे. वास्तविक परस्परात प्रेम वाढावे म्हणून भगवंतास हाक मारावी, त्यास आळवावे नाही तर आयुष्य संपून जाईल. आपले सर्व भाव बदलले पाहिजेत. भगवंताच्या प्रसन्नतेस अनुसरून वागावे. मनाला विचारावे की यासाठी काय करूं? प्रत्येक वेळी अशी भावना करावी की भगवान माझ्यावर फार प्रसन्न आहेत, भगवंताचे माझ्यावर अत्यंत प्रेम आहे. लोकांमध्ये नवचैतन्य आले पाहिजे, सर्वांच्या मनात खूप जागृती आली पाहिजे. ज्याप्रमाणे कौरव-पांडवांच्या युद्धात अर्जुन लढत असे, तसे व्हावयास हवे. जो कायर, भित्रा असेल नपुसंक असेल त्याच्यात जर नवचैतन्य उत्पन्न होईल तर तो मारण्यास आणि मरण्यासही तयार होईल.

शास्त्रांतही ही गोष्ट सांगितली आहे. तेच सर्व श्लोक गीतेतही आहेत, आपल्यामध्ये असे भाव यावेत म्हणून आपण योग्य ते प्रयत्न केले पाहिजेत. सध्या मनाच्या अनुकूलतेमध्ये प्रसन्नता वाटते, प्रतिकूलतेमध्ये द्वेष, घृणा, तिरस्कार चिन्ता उत्पन्न होत असते. मनाच्या प्रतिकूल एखादे काम कार्य घडत आहे असे दिसले तर त्यावेळी असे समजावे की हे ईश्वरेच्छेने घडत आहे, भगवान करीत आहेत. दुसऱ्याच्या इच्छेने झाले तर असे समजावे की भगवान करून घेत आहेत खूप आनंदात मग्न राहावे, कधीही भगवंतास विसरू नये. नामदेवांच्या झोपडीस आग लागली तेव्हा जे सामान वाचले होते तेही त्यांनी आगीत टाकले की हे देवा, याचाही भोग घ्यावा.

मनाच्या प्रतिकूल रोग आदि उत्पन्न झाले तर खूप आनन्द

मानावा की भगवानच सर्व करीत आहेत. परेच्छेने कितीही नुकसान झाले तरी हे सर्व भगवानच करवीत आहेत असे मानावे.

प्रत्येक कामात आनन्द मानला तर आनन्दच होतो. फार उत्तम साधन आहे. दुसरी आनन्दाची गोष्ट अशी आहे की भगवान प्रत्येक समयी जवळच उभे आहेत. त्यांच्या आज्ञेने काम करीत आहे, असे समजावे. भगवान तुमच्यावर प्रसन्न आहेत. त्यांच्या प्रसन्नतेमुळे प्रसन्नता होते. स्वेच्छेने काम होत असेल तर समजावे की भगवान पहात आहेत, परेच्छेने होत असेल तर समजावे की भगवान करवीत आहेत, करून घेत आहेत. अनिच्छेने होते तेव्हा तेच करीत आहेत असे समजावे.

प्रत्येक वेळी भगवंताचे स्वरूप, दया, प्रेम यांचे स्मरण करून प्रसन्न होत असावे. भगवंताच्या ठिकाणी आपले प्रेम, श्रद्धा जितकी आपण मानू तितका आनन्द प्रत्यक्षात आहे. तितकी शान्ती आणि आनन्द प्राप्त होईल. आपली सर्व क्रिया भगवन्मय होईल तर फारच लवकर भगवंताच्या ठिकाणी प्रेम उत्पन्न होईल. आपण प्रत्येक क्षणी भगवंताचीच चर्चा करीत असावे आणि कुठल्याही गोष्टीची इच्छा करू नये. समजा जरी नरकात गेलो तरी ही गोष्ट फार उत्तमच आहे. भगवंतानी विचारले की— कशाची इच्छा आहे तर हेच मागावे की हरघडी आपल्या प्रेमाच्या गोष्टीच होत राहाव्या; भगवंताचे भजन कधी अटी घालून करू नये. भगवंताचे ध्यान जमत नसेल तर भिंतीवर मूर्ति ठेवून चित्र लावून डोळ्याला डोळा लावून मुग्ध व्हावे आणि असे समजावे की भगवंताचे गुण माझ्यामध्ये येत आहेत, खूप प्रसन्न व्हावे. या प्रकारेच महात्म्यांची भेट झाली तर विचार करावा की ते दयेने दृष्टीक्षेप करीत आहेत आणि प्रेमात इतके मुग्ध होऊन जावे की माझ्यासारखे भाग्य दुसऱ्या कोणाचे आहे? नेत्रात समता, शान्ति,

प्रेमाचे परमाणु भरून राहिले आहेत. रोमारोमात जणु आनन्दच आनन्द भरून राहिला आहे. कधी कोठे महात्म्यांचे दर्शन झाले तर त्यांना प्रेम, ज्ञान, वैराग्याचा पुंज समजावे. भगवान जसे गुणांचे पुंज आहेत तसेच त्यांनाही गुणांचा पुंज समजावे. मी त्यांच्या दर्शनाने गुणांचा समूह माझ्या ठिकाणी भरून राहिलो आहे असे समजावे. आपण अग्नीला पहातो तेव्हा नेत्रात उष्णतेचे परमाणु येतच असतात तसेच महापुरुषांना पाहून त्यांचे सारे गुण आपल्यांत येत आहेत असे समजावे. आपल्या अंत:करणातील भावच गुणांना आकर्षित करीत असतात, तेच द्वार आहे. हीच बुद्धि, स्त्रीची आपल्या पतीच्या ठिकाणी, बालकाची माता-पित्यांचे ठिकाणी आणि शिष्याची गुरुच्या ठिकाणी जर दृढ झाली तर आनंदाला मर्यादा राहात नाही मग महात्मा लोकांची तर गोष्टच काय सांगावी ? महात्मा तर भगवंताचे स्वरूप असतातच. सर्वांच्या ठिकाणी अशी बुद्धि होत नाही पण काही विशेष ठिकाणी अशी बुद्धि करावी.

अर्जुनाने विचारले—‘**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥**’

भगवंतानी खास खास वस्तुमध्ये आपली विभूति सांगितली. जी जी तेजस्वी वस्तु असेल तिच्यामध्ये भगवद्भाव करावा भगवद्भाव होऊ शकत नसेल तर साधु भाव करावा. सर्वमहापुरुष आहेत, सर्व साधु आहेत.

वर्षा ऋतुमध्ये त्यातील थंडावा रोमारोमात प्रवेश करीत असतो त्याप्रमाणे आनंदाची वृष्टि होत असून मी त्यामुळे मुग्ध होत आहे. ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्रीला आपल्या पतीच्या चरणस्पर्शाने, शिष्याला गुरुच्या चरणस्पर्शाने सारे शरीरात रोमांच येतात! त्याप्रमाणे माझी स्थिति होत आहे असा भाव करावा. भगवंतानी आपल्याशी

संभाषण केले तर किती आनंद होईल बरे? कल्पना तर आपण करू शकतो ना? भगवंताशी बोलण्याने जो आनन्द होतो त्या प्रमाणे सर्वांशी बोलण्या चालण्यात आनंद वाटू लागणे हे फार मोठे साधन आहे, मोठे धन आहे. याला लाथाडणे म्हणजे किती मूर्खपणाची गोष्ट आहे. आपण सर्वच ठिकाणी असा भाव धरला पाहिजे. सर्व ठिकाणी होत नसेल तर जे भगवत प्राप्तीच्या साधनात आहेत किमान त्यांच्या ठिकाणी करावा. नाहीतर भगवान अथवा महापुरुषांच्या ठिकाणी तरी करावा. भगवान तर सर्व ठिकाणी आहेतच. ते कुठे गेले आहेत थोडेच? महाभारताच्या मौसलपर्वात अर्जुनाने वेदव्यासांना म्हटले आहे की भगवान कसे जाऊ शकतील, पण ते दृष्टीगोचर होत नाहीत म्हणून मन अस्वस्थ आहे. वेदव्यासांनी म्हटले 'भगवान परमधामास निघून गेले आहेत' म्हणून आता तूही हिमालयात जाऊन शरीराचा त्याग कर.

आनन्द ही तर आपल्या हातातील गोष्ट आहे. हर घडी आनन्दात नाचत राहा, मग तो संयोगाचा आनंद असो अथवा वियोगाचा असो. आनन्दात मुग्ध रहा, ज्याप्रमाणे गोपी राहात असत त्याप्रमाणे! ज्ञानमार्गातही सर्व ठिकाणी आनन्दच आनन्द परिपूर्ण आहे. आनन्दमय परमात्मा खाली आणि वर सर्वत्र परिपूर्ण भरून राहिलेला आहे.

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः॥**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः॥**
**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय॥**

(गीता ९। ४—६)

मी जो निराकार परमात्मा त्याने हे सम्पूर्ण जगत जलाने बर्फ व्याप्त असते तद्वत परिपूर्ण आहे आणि सर्वभूते माझ्या अन्तर्गत संकल्पाच्या आधारे स्थित आहेत, परंतु वास्तविक मी त्यांच्यात स्थित नाही.

ही सर्व भूते माझ्या ठिकाणी स्थित नाहीत, परंतु माझ्या ईश्वरी योगशक्तिला पहा की भूतांचे धारणपोषण करणारा आणि भूतांना उत्पन्न करणारा माझा आत्माही वास्तविक त्यांच्यात स्थित नाही.

ज्याप्रमाणे आकाशापासून उत्पन्न होऊन सर्वत्र विचरण करणारा महान वायु सदा आकाशातच स्थित आहे. त्याप्रमाणेच सम्पूर्ण भूते माझ्या संकल्पाद्वारे उत्पन्न झाली असल्याने माझ्यातच स्थित आहेत असे जाण.

या प्रकारे आनन्दमय परमात्म्यास पहावे. पूर्ण आनन्दघन, आनन्दघन! या प्रकारे उच्चारण केल्यानेही रोमांच येऊ लागावे. या प्रकारे भक्तिच्या मार्गातही आपल्या मनाने सर्वत्र भगवंतास पाहून प्रसन्न व्हावे. पतिव्रता स्त्री ज्याप्रमाणे आपल्या पतीचे गुण पाहून प्रसन्न होत असते, त्या प्रमाणेच भगवंताचे भक्तही भगवंताचे गुण, प्रभाव पाहून प्रसन्न होत असतात.

महापुरुष कोठे भेटले तर त्यांना पाहून प्रसन्न व्हावे जर प्रत्यक्ष भेटले नाहीत तर त्यांची आठवण करून प्रसन्न होत राहावे. हे सर्वभाव आपण आपल्या हृदयात धारण करणे जरूर आहे. क्षणोक्षणी आनन्दात मुग्ध होणे आवश्यक आहे. असे होण्याचा उपाय किती सोपा आहे, नाही कां? प्रभूची कृपा तर आहेच आहे नाही तर आपण सर्व एकत्रित जमून भगवत चर्चा कशी केली असती? प्रत्येक ठिकाणी लढाईची चर्चा चाललेली आहे. आपली तर भगवत चर्चा चालू असतांना तोफेचे गोळे

खुशाल वर्षाव करोत! हर घडी आनन्दात मग्न राहा. ज्ञान मार्ग असेल तर हा श्लोक लक्षात ठेवावा.

**सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम्।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः॥**
**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते॥**

(गीता ६।२१-२२)

इन्द्रियांहून अतीत, केवल शुद्ध झालेल्या सूक्ष्म बुद्धिद्वारा ग्रहण करण्यायोग्य जो अनन्त आनन्द आहे, त्याचा ज्या अवस्थेत अनुभव येतो आणि ज्या अवस्थेत स्थित असलेला हा योगी परमात्म स्वरूपाहून विचलीत होत नाही-

परमात्मप्राप्तीरूपी जो लाभ प्राप्त झाल्यावर जो त्याहून अधिक दुसरा कुठलाही लाभ मानत नाही आणि परमात्मप्राप्तीरूपी ज्या अवस्थेत स्थित झालेला योगी मोठ्यात मोठया दुःखानेही विचलीत होत नाही.

या श्लोकांना सार्थक करावे. वाचलेले तर आहेतच पण अक्षरशः साक्षात तसा अनुभव घ्यावा असे सुख आहे असा विश्वास तर केलाच पाहिजे. प्राप्त नाही झाले तर काय झाले? भगवन्ताचे वचन तर आहेच ना! आनन्दच आनन्द!

भक्तिच्या मार्गानेही अत्यंत लवकर प्रेम होऊ शकते. हर घडी स्वतःला आनन्दात डुंबत ठेवावे. भगवन्ताची आणि महापुरुषांची वारंवार आठवण करावी आणि भगवंताचा अनुभव घेऊन आनन्दात मुग्ध होऊन राहावे. प्रभूचा हात आपल्या मस्तकावर आहे, प्रभू आनन्द आणि प्रेमाचा आपल्यावर वर्षाव करीत आहेत, याच प्रकारे जेथे सत्संग चालू असतो तेथेही प्रेम आणि आनन्दाचा वर्षाव होत असतो. ज्यांचा असा भाव असेल

त्यांना प्रत्यक्ष तसे दिसते, तसा अनुभव येतो. ज्यांचा भाव नसेल त्यांना दिसत नाही, अनुभव येत नाही, हजार घुबडे असली तरीही ती सूर्याच्या प्रकाशाला अन्धकारच म्हणतील पण वास्तविक तर प्रकाशच असतो.

तोच मनुष्य, मनुष्य म्हणवून घेण्यास लायक आहे ज्याला सर्वत्र प्रेमाचा आणि आनन्दाचा अनुभव येतो, ज्याला असा अनुभव येत नसेल तो उलूक आहे. घुबड आहे पशु, पक्षी आहे. हर घडी आनन्दात बुड्या मारा, भगवत कृपा आहे असे माना. हे अशासाठी मानावयाचे आहे की अहंकार होऊ नये. प्रयत्नाची गोष्ट अशासाठी सांगितली की माणसाने प्रयत्नहीन होऊ नये. प्रभुची कृपा आहे, महापूरुषांची कृपा आहे. आपल्या प्रयत्नांची कमतरता हा आपला मूर्खपणा आहे, हे अज्ञान दूर सारा.

भगवंताचे येणे न येणे त्यांच्या अधिकारातील गोष्ट आहे. परन्तु आपण येथे भगवान आहेत असे मानले तर त्यांच्या येण्यामुळे जे काम होते तेच काम आपल्या मानण्यामुळेही होईल. त्यांना गरज असेल तर येतील असे मानून आणि ते आपल्यात आहेत ही जाण ठेऊन सहभागी करून घेऊन कीर्तन करावे, नृत्य करावे. जसे गोपी प्रभूंना घेऊन करीत असत तसेच आपण भगवंतास अथवा महापुरुषांना सहभागी करून करावे. नंतर प्रभूंना बोलावण्याची आवश्यकता नाही. असे वातावरण निर्माण केले पाहिजे की ते आल्याखेरीज राहूच शकणार नाहीत. पहारा बसवा आणि ते आले तरी त्यांना येऊ देऊ नका. पुस्तकात अशा गोष्टी वाचनात येतात परन्तु असे पुरुष उपलब्ध नाहीत. आम्ही का बरे यासारखे योग्य बनू शकलो नाही! या जगात कुठलीही गोष्ट असंभवनिय नाही. हरघडी प्रभु जवळ आहेत असे मानून आनन्दात मग्न राहिले पाहिजे. ही गोष्ट जाणून घेण्यासाठी

गीताप्रेस द्वारा प्रकाशित 'ध्यानावस्थेमध्ये प्रभूशी वार्तालापं' पुस्तक वाचणे आवश्यक आहे.

प्रथम तर आपण भावावेशात येऊन त्यांच्याशी बोलावे मग भगवान प्रत्यक्ष येतील! आणि विलंब तरी काय आहे? प्रथम माझ्या मनात असे येत असे की प्रभूनी येऊन विचारले की काय इच्छा आहे तर सांगीन की काहीही इच्छा नाही, फक्त या प्रकारे मी तुमची चर्चा करीत राहावे. आता तर असे वाटत आहे की ते जे करतील तेच ठीक आहे.

आपण आपले साधन करीत राहावे, हर घडी आनन्दात मुग्ध राहावे ही फार उच्च प्रकारची साधना आहे. बर्फाचा तुकडा जसा जळाने भरून राहिलेला असतो त्या प्रमाणे आनन्द होऊन आनन्दात तरंगत राहावे. 'आनंदाचे डोही आनन्द तरंग.' त्या भक्तीमार्गात आनन्दाचा दाता प्रभूला मानावे, ते जवळ उभे आहेत, आनन्द प्रदान करीत आहेत. मी प्रसन्न होत आहे. मला पाहून तेही प्रसन्न होत आहेत ही कल्पना करून आपली प्रसन्नता उत्तरोत्तर वाढत जावी. ही अवस्था मनुष्य बनवू शकतो. ही अधिकाराची बाब आहे. ज्याची अशी स्थिती राहाते त्याला वाटल्यास अग्नित टाका अगर मारून टाका त्याला काही कष्ट होत नाहीत. याच कारणामुळे प्रल्हादाला अग्नित टाकले, सुधन्व्यास उकळत्या तेलाच्या कढईत टाकले, मीरेला विषाचा प्याला दिला गेला तरी या कृत्यांचा त्यांच्यावर काही प्रभाव पडला नाही.

ज्याप्रमाणे माशाचे चित्त जलात राहाते त्या प्रकारे भगवन्तातच चित्त लागावे. भगवन्तासच, त्यांच्यासाठीच आपले प्राण अर्पित व्हावेत, प्रभूमध्येच सदा रमावे.

प्रभूंच्या चरणांना स्पर्श करून आल्हादित होणे हे स्पर्श द्वारा

रममाण होणे आहे. येथे सर्व गोष्टी मानसिक आहेत. प्रभु अत्यंत मुग्धपणे बोलत आहेत, ओठ हलत आहेत. त्या ओठांची हालचाल चित्त मोहून टाकीत आहे. प्रभुच्या ओठावर साक्षात अमृत विराजत आहे. त्यांची वाणीही अमृतमयी आहे. अमृताचा वर्षाव करीत आहे, ती प्रेममय आहे. अशा प्रकारे रमूण मुग्ध व्हावे. प्रभूला मी भेटत आहे, ते मला हृदयाशी धरून आलिंगन देत आहेत. त्यावेळी आपले वस्त्र सुद्धां बाधक वाटू लागते. प्रभुच्या दर्शनाने नेत्रांना अमृतपान घडत आहे. प्रभूच्या भोजनानंतर बाकी राहिलेला प्रसाद अमृतच आहे. त्या प्रसादाचे द्वारा आपण अमृतपान करीत आहोत. प्रभूपासून जो सुगन्ध येत आहे त्याच्यामुळे नासिकेच्या द्वारा आपण अमृतपान करीत आहोत. आपण तन, मन, धनाने स्वतःला प्रभूच्या चरणी अर्पित केले आहे. या प्रकारे आनन्दात मुग्ध होऊन राहिले पाहिजे. भगवान म्हणतात की या प्रकारे जे करतात त्यांना मी बुद्धियोग देतो, आणि त्यामुळे ते मलाच प्राप्त होतात.



# महात्म्याची ओळख

महात्म्याच्या जवळ उपदेश घेण्यासाठी गेले तर भगवान सांगतात की—

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥**

(गीता ४।३४)

तत्त्वदर्शी ज्ञानी लोकांजवळ जाऊन त्या ज्ञानाला तू समजून घे. त्यांना उत्तम प्रकारे आदराने, प्रेमाने प्रणाम करण्याने, त्यांची सेवा करण्याने आणि कपट सोडून सरळतापूर्वक प्रश्न केल्याने ते परमात्मतत्त्व उत्तम प्रकारे जाणणारे ज्ञानी महात्मा तुला त्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करतील.

त्याचे फळ हे असेल—

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि॥**

(गीता ४।३५)

ज्यास जाणले असता तुला या प्रकारे परत मोह होणार नाही आणि हे अर्जुना! ज्या ज्ञानाचे द्वारा तू सम्पूर्ण भूतांना निःशेषभावाने प्रथम स्वतः आपल्या ठिकाणी आणि नंतर मी जो सच्चिदानन्दघन परमात्मा त्याचे ठिकाणी पाहशील.

ज्या महात्म्याचा असा प्रभाव पडतो तो ज्ञानी महात्मा आहे. महात्मा जर यथार्थ ज्ञानी असेल पण शिष्य यथार्थ लायक नसेल तर महात्मा प्रथम तो पात्र व्हावा म्हणून उपदेश देतील. कुठल्याही कारणाने त्यांनी दयामय व्यवहार केला तरी त्यांच्या उपदेशाचा थोडा बहुत तरी परिणाम झाल्याशिवाय राहाणारच नाही.

महात्म्याजवळ जितके लोक बसतील त्यांच्यात दैवी सम्पदेचा

भाव येईल. त्यांच्या समोर असतांना आसुरी सम्पदेचा भाव कमी होईल. एखादा मनुष्य सत्यवादी असेल तर त्याच्या समोर खोटे बोलण्याचा भाव दबून जातो.

आपण अन्धःकारात, अज्ञानात आहोत; आपल्या जवळ महात्मा आल्यावर आपल्या हृदयात प्रकाश होतो. ज्या महात्म्याच्या सहवासात सद्भावांचा उदय होत नसेल त्या महात्म्याकडे येण्याजाण्याचे आपल्याला काही काम नाही.

**प्रश्न**—प्रथम तर श्रद्धा होते पण नंतर टिकत नाही?

**उत्तर**—श्रद्धा एक तर स्वभाव सिद्ध होत असते आणि एक गुण, आचरण, प्रभाव यामुळे उत्पन्न होत असते. दुरून त्या महात्म्याची प्रशंसा ऐकली, जाऊन महात्म्यामध्ये जे गुण असणे आवश्यक आहे ते त्यांच्याठिकाणी आहेत का म्हणून पाहू लागल्यावर जर ते गुण त्यांच्या ठिकाणी आढळून आले नाहीत तर मग श्रद्धा कमी होते.

एखाद्या दम्भी माणसाविषयीही आपला भाव चांगला असेल तरी काही हानी नाही. परमात्म्यास शरण गेलो असू तर परमात्मा काय देईल? भगवान जर इतके ही रक्षण करीत नसतील तर अशा भगवंतास भेटून काय फायदा? जो भगवंतानी चेतविल्यावर जागृत केल्यावरही सावध होत नाही तो भगवंताचा भक्त नाही. ईश्वरावर निर्भर होऊन राहिले तर त्यास भगवान वाचवितात, त्याचे रक्षण करतात म्हणून ईश्वरासच शरण जावे. मुलगा आग्निकडे धावतो आहे तर त्याची आई त्यास वाचविते, आई प्रत्येक वेळी लक्ष ठेवीत असते. ती स्वयंपाक करीत असेल, आणि मूल जर साप, विंचू याकडे जात असेल तर ती भाकरी करण्याचे सोडून धावत येते आणि चटकन बाळास उचलून घेते, त्यास समजावते की 'बाळा, हा तुला चावेल बरं!'

एक लहान मुलगा विस्तवाकडे जात आहे, चमकणारा निखारा पकडण्यासाठी जात आहे, आईच्या दृष्टीस पडले तर ती लगेच धावत येऊन त्यास उचलून घेते. एकदा मुलाने त्या निखाऱ्यास हात लावला, हात भाजला, आता त्याला ज्ञान झाले.

कंदील ठेवलेला आहे, मुलगा हात लावू लागतो, आई समजावते की बाऊ आहे, त्याला समजत नाही. मग आई त्याचे बोट पकडून कंदीलास लावते. गरम लागले, की मूल बोट बाजूस करते, आणि रडू लागते. आता त्या मुलास धोका कळतो. त्याला ज्ञान होते. या प्रकारे परमात्माही भोळ्या मनुष्यांना ज्ञान करून देतात.

जो स्वतःच वाचतो तो ज्ञानी आहे. जे भक्त आहेत त्यांना भगवान वाचवितात. म्हणून भगवंतावर निर्भर झाले पाहिजे, म्हणजे भगवानच वाचवितात, रक्षण करतात. व्याख्यानाचे सार हे आहे की विश्वास ही फार श्रेष्ठ वस्तु आहे. आपला भगवंतावर भरवसा नाही म्हणूनच आपणा सर्वांची दुर्दशा होत आहे. ईश्वरावर भरवसा असेल तर फार मोठे काम होऊन जाते, निर्भयता येते. संसारात किती गडबड-गोंधळ (अडंग-बडंग) माजला आहे, लोक भयभीत होत आहेत, त्यामध्ये मुख्य कारण भगवंतावरील भरवशाची कमतरता हे आहे. जो भगवंतावर भरोसा ठेवतो त्याला कुठल्या गोष्टीची चिन्ता असणार आहे? भगवंताचा जो आश्रित होतो तो असे समजतो की माझे अनिष्ट होऊच शकत नाही. अनिष्ट झाले तरी तो त्यास भगवंताचा पुरस्कार समजतो आपल्या स्वामीचे विधान समजतो.

जोपर्यत भय राहाते तोपर्यंत कच्चेपणा आहे. हा कच्चेपणा फार दूरवर टिकतो, भगवान अर्जुनास म्हणतात—

**मा ते व्यथा मा च विमूढभावोदृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वंतदेव मे रूपमिदं प्रपश्य॥**

(गीता ११।४९)

माझे या प्रकारचे विक्राळ रूप पाहून तू व्याकुळ होता उपयोगी नाही; आणि तुझ्या ठिकाणी मूढभावही उत्पन्न होता कामा नये. तू भयरहित आणि प्रीतियुक्त मनाने माझ्या या शंख-चक्र-गदा-पद्मयुक्त चतुर्भुज रूपास परत पहा—

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया॥**
**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे॥**

(गीता ४।६—८)

मी अजन्मा आणि अविनाशीस्वरूप असूनही तसेच समस्त प्राणिमात्रांचा ईश्वर असूनही आपल्या प्रकृतिला आधीन करून आपल्या योगमायेने प्रकट होतो.

हे भारता! जेव्हा जेव्हा धर्माची हानि आणि अधर्माची वृद्धि होते तेव्हा तेव्हा मी साकार रूपाने लोकांच्या समोर प्रकट होतो.

साधु पुरुषांचा उद्धार करण्यासाठी, पाप-कर्म करणारांचा विनाश करण्यासाठी आणि धर्माची चांगल्या प्रकारे स्थापना करण्यासाठी मी युगायुगांत प्रकट होत असतो.

या वचनांनी भगवान स्वतःच सांगत आहेत की मी भगवान आहे. अर्जुन म्हणतो की मी आपल्या वचनांना यथार्थ मानतो, मला आपले स्वरूप दाखवा.

भगवंतांनी दिव्य दृष्टी देऊन आपले स्वरूप दाखविले. अर्जुन भयभीत झाला. भगवान म्हणतात—तू भयभीत होता कामा नये. स्वामी कडून आणि आपल्या प्रिय मित्रा कडून कधी हानी होऊ शकते का? तुला दुःख, मोह होता कामा नये. परन्तु घटना तर घडली.

हा विश्वास असला पाहिजे की भगवान कधी हानी करू शकत नाहीत. अर्जुनाने जशी प्रार्थना केली तशी तात्काळ भगवंतांनी चतुर्भुज स्वरूप दाखविले.

जोपर्यंत परमात्म्याचे यथार्थ ज्ञान होत नाही तोपर्यंत दर्शन होऊनही भय वाटू शकते. अर्जुनामध्ये प्रथम थोडा कच्चेपणा होता. शेवटी अठराव्या अध्यायांत भगवंतांनी विचारले की तुझा मोह नष्ट झाला की नाही?

अर्जुनाने सांगितले की 'हो' तुमच्या कृपेने झाला. अर्जुनाने तर प्रथमही सांगितले होते की मी तुम्हाला शरण आलो आहे पण भगवंत त्यास शरण आलेला मानत नाहीत कारण त्यानंतरही अर्जुनाने म्हटले आहे की मी युद्ध करणार नाही. सम्पूर्ण शरणागति तर अठराव्या अध्यायात झाली आहे. अकराव्या अध्यायात तर भगवंतानी म्हटलेच आहे की तुझ्या ठिकाणी मूढभाव असता कामा नये. हा मोह शेवटपर्यंत राहिला आहे. ईश्वराला, महात्म्याला न ओळखणे हा मूढभाव आहे.

दर्शनाने होणारी जाण ही एक वेगळीच विलक्षण गोष्ट आहे. तत्त्वतः जाणणे और गोष्ट आहे, दर्शन ही वेगळी गोष्ट आहे आणि प्राप्ती होणे ही आणखी वेगळी गोष्ट आहे. भक्तीने तिन्ही गोष्टी होऊन जातात.

अर्जुनाच्या पहाण्यात तर कमतरता नव्हती, पण तत्त्वत:जाणण्यात कमतरता होती. आम्ही महात्मा लोकांच्या जवळ जातो, दर्शनही घेतो, परन्तु तत्त्वतः जाणत नाही. नाहीतर त्यांना सोडून निघून कसे आलो असतो? त्या महात्म्यांपेक्षां श्रेष्ठ दुसरी कुठली गोष्ट आहे? कुणी परीस बघून आला आणि म्हणाला की मी परीसाचे दर्शन घेऊन आलो, आणि तो परीसास सोडून

निघून आला-असेल तर त्याने पत्थराचे दगडाचे दर्शन केले असेच म्हणावे लागेल.

ज्यावेळी भगवंतांनी साक्षात अवतार घेतला होता त्यावेळी अगदी मोजके लोकच त्यांना जाणत होते. प्रत्यक्ष असूनही जर ईश्वरास जाणणारे फार कमी लोक होते तर मग महात्म्यास ओळखणारे कमी लोक असले तर त्यात काय आश्चर्य?

भगवान म्हणतात—

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्॥**

(गीता ९।११)

माझ्या परमभावाला न जाणणारे मूढ लोक मनुष्य शरीर धारण करणाऱ्या मला, सम्पूर्ण भूतांच्या महान ईश्वराला तुच्छ समजतात. अर्थात आपल्या योगमायेने संसाराचा उद्धार करण्यासाठी मनुष्य रूपाने विचरणाऱ्या मला-परमेश्वराला साधारण मनुष्य मानतात.

मला परमेश्वराला—परमेश्वर न मानणे म्हणजे माझा तिरस्कार करणे आहे. मूढ लोकांचा समूह मला जाणत नाही.

भगवान म्हणतात—

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्॥**

(गीता ७।२५)

आपल्या योगमायाने लपलेला मी सर्वांना प्रत्यक्ष होत नाही, म्हणून हा अज्ञानी जनसमुदाय मला जन्मरहित अविनाशी परमेश्वराला जाणत नाही अर्थात मला जन्मणारा मरणारा समजतो.

हा योगमायेचा पडदा ईश्वराची शक्ती आहे. हा पडदा दूर कसा होईल? भगवंताला शरण जाण्यानेच होईल.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥**

(गीता ७।१४)

कारण ही अलौकिक अर्थात अत्यंत अद्‌भुत आणि त्रिगुणमयी अशी माझी माया फारच दुष्कर आहे परन्तु जो पुरुष केवळ मलाच निरन्तर भजतो तो या मायेचे उल्लंघन करू शकतो अर्थात संसार सागरातून तरून जातो.

नाहीतर भगवंताजवळ राहूनही कल्याण होऊ शकत नाही. दुर्योधन आदिनी भगवंतास जाणले नाही. त्याप्रकारेच या जगात् (संसारात) महात्मा लोक अनेक आहेत पण त्यांची ओळख पटल्याखेरीज लाभ होत नाही. ओळख न पटण्याचे कारण आहे ईश्वराची माया. म्हणूनही ईश्वरास शरण जाणे हीच सर्वश्रेष्ठ गोष्ट आहे. त्या परमात्म्यालाच शरण गेले पाहिजे. भगवान म्हणतात—

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥**

(गीता १८।६६)

सम्पूर्ण धर्मांचा अर्थात कर्तव्यकर्मांचा माझ्यामध्ये लय करून तू केवळ एक मला सर्वशक्तिमान, सर्वाधार, परमेश्वरालाच शरण ये. मी तुला सम्पूर्ण पापातून मुक्त करतो, तू शोक करू नको.

या श्लोकात चार गोष्टी सांगितल्या आहेत—(१) सर्व धर्मांचा त्याग. (२) मला शरण येणे. (३) मी सर्व पापातून मुक्त करीन. (४) तू शोक करू नको.

सर्व धर्मांचा त्याग म्हणजे काय आहे?

हा श्लोक फार गहन आहे. ब्रह्मदेवाजवळ देवता, असुर, मनुष्य उपदेश घेण्यासाठी गेले होते. ब्रह्मदेवांनी तिघाना उपदेश

केला—'द'—याचे तात्पर्य तिघासाठी याप्रकारचे होते. दानवांसाठी सांगितले दया करा. मनुष्यांना सांगितले दान करा. देवंताना सांगितले—इन्द्रियांचे दमन करा.

याप्रकारे भक्ति मार्ग असणारा हा अर्थ काढतो की यज्ञ, दान, तप, सर्व सोडून ईश्वराची भक्ति करा.

जे कर्मयोगी आहेत ते अर्थ करतात की कर्माचा स्वरूपतः त्याग करू नये, त्याच्या फळाचा त्याग करावा.

ज्ञानमार्गी असेल त्याने अर्थ काढला की इन्द्रिये आणि मनाच्या क्रिया शरीराचा धर्म आहे, तू आत्मा आहेस शरीराच्या धर्माचा त्याग कर.

अर्जुनास भगवंतांनी काय सांगितले हे तर भगवान आणि अर्जुनच जाणोत. मला जर विचारालकी तुम्ही काय अनुमान केले आहे ? मी तर हे अनुमान केले आहे.

मला एकालाच शरण ये यातून असा ध्वनी निघतो की सर्व धर्मांचा आश्रय सोड. फळ सोडणे आणि आश्रय सोडणे यात हे अन्तर आहे की फल त्याग करणाऱ्यामध्ये अभिमान शिल्लक राहातो, आश्रय घेणारात अभिमान राहात नाही. कठपुतळी प्रमाणे नाचतो कारण नाचणारा सूत्रधार-परायणच असतो. क्रियाही भगवत्परायण असते आणि स्वयंही भगवत्परायण असतो. '**सर्वधर्मान्**' याने क्रिया अर्पण झाली '**शरणं व्रज**' याने आपण आपल्याला अर्पण करणे आहे. तात्पर्य हे आहे की भगवान म्हणतात की मी जसे करवीन तसे तू कर.

अर्जुनाने याचे उत्तर दिले—'**करिष्ये वचनं तव**' हा श्लोक कठपुतळी पर होऊ शकतो. अन्तःकरण जड आहे. येथे स्वतःशरण जाण्याची गोष्ट आहे. स्वतः चेतन असून जड कठ—पुतळी प्रमाणे होणे ही विशेषता आहे.

भगवंतास शरण जाण्याचे फळ काय ते भगवंतानी या प्रमाणे सांगितले आहे-मी सर्व पापांतून मुक्त करीन तू शोक करू नको.

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव॥**
**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि॥**

(गीता १८ । ५७-५८)

सर्वकर्मांना मनाने मला अर्पण करून आणि समबुद्धिरूपी योगाचे अवलम्बन करून तू मत्परायण आणि माझ्या ठिकाणी चित्त असलेला हो.

उपर्युक्त प्रकारांनी माझ्या ठिकाणी चित्त असणारा तू माझ्या कृपेने समस्त संकटातून अनायासे पार जाशील आणि जर अहंकारामुळे माझ्या वचनांना तू ऐकले नाहीस तर नष्ट होशील अर्थात परमार्थापासून भ्रष्ट होशील.



# भगवंताची भक्ती करावी

मला हे मान्य आहे की महापुरुषांचे दर्शन, भाषण, स्पर्श आणि त्यांची चरण-धूळी धारण करण्याने मनुष्य पवित्र होऊन जातो. पवित्रतेची सीमा भगवत्प्राप्तीपर्यंत आहे. आपापल्या भावास अनुसरून लाभ होतो, ही गोष्ट शास्त्रसंमत आणि युक्तिसंगत आहे.

भगवान अथवा महापुरुषांच्या दृष्टीत तर भेदभाव नाही. सूर्य-भगवान सर्व भूमण्डलास प्रकाशित करतात.परंतु काष्ठात, लाकडात प्रतिबिंब येत नाही, काचेत आणि जलात येते. सूर्य भगवान तर सर्वांना समानरूपाने प्रकाशित करतात.

विवेकबुद्धिने विचार केल्यास कळून येते की उज्ज्वलता ही पदार्थाची विशेषता असते. तीच काच सूर्यमुखी असेल तर ती वस्त्रास सुद्धा जाळू शकते. या प्रकारेच ज्यांचे अंत:करण शुद्ध असते त्यांच्यावर महात्म्यांचा तसेच भगवंताचा जास्त परिणाम होतो. सूर्यमुखी काचे-प्रमाणे तो महात्म्यांच्या भावांना आपल्याकडे ओढून-खेचून घेतो.

भगवान म्हणतात—

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्॥**

(गीता ९ । २९)

मी सर्व भूतांमध्ये समभावाने व्यापक आहे, मला कोणी अप्रिय नाही अथवा प्रिय नाही, परन्तु जे भक्त मला प्रेमाने भजतात ते माझ्यात आहेत आणि मीही त्यांच्यात प्रत्यक्ष प्रकट आहे.

तो आपल्या प्रेमाच्या जोरावर मला आकर्षित करून घेतो. महात्मा तसेच भगवान प्रेमाला वश होत असतात. प्रेम ही अशी गोष्ट आहे की जिच्याद्वारे तुम्ही इच्छा असेल त्याला वश करू शकता.

भगवंतानी अर्जुनासही विराटरूप दाखविले आणि दुर्योधनालाही विराटरूप दाखविले. ज्याचा जसा भाव होता त्याला अनुसरून त्याला फळ मिळत असते.

त्या महापुरुषांना श्रद्धा तसेच प्रेमानेच जाणले जाऊ शकते. कुठे श्रद्धा शब्द येतो तर कुठे प्रेम शब्द येईल.

श्रवणपरायण व्हावे आणि मग प्राण असेपर्यंत त्यासाठी प्रयत्न करावे. भगवान रामचंद्राना माता कौसल्येने समजाविले की जर तू माझी आज्ञा न मानता वनात जाशील तर मी उपवास करून प्राणत्याग करीन, तुला पाप लागेल. तेथे खूप आग्रह केला आहे. भगवान रामांनी उत्तर दिले—'माते! पित्याचे वचन न मानण्याचे सामर्थ्य माझ्या ठिकाणी नाही.' मी अग्नित उडी घेऊ शकतो, तीव्र विषही भक्षण करू शकतो आणि समुद्रातही उडी घेऊ शकतो नव्हे सीतेचाही त्याग करू शकतो पण पित्याच्या वचनांचा त्याग मी करू शकत नाही.

**अहं हि वचनाद् राज्ञः पतेयमपि पावके।**
**भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे॥**

त्यांचा चेहरा अत्यंत प्रसन्न दिसत आहे. त्यांना राज्य मिळणार होते पण आता वनवासात जावे लागणार आहे. पित्याच्या वचनांवर किती श्रद्धा आहे! लक्ष्मणालाही क्रोध आला आणि तो म्हणाला–दशरथाचे मस्तक कापून मी आपल्याला राज्य देईन. स्त्रीला वश होऊन कोणी काही सांगेल तर त्यांच्या आज्ञेचे पालन आम्ही करणार नाही.

भगवान रामांनी सांगितले की माझी इच्छा राज्य करण्याची नाही. लक्ष्मणही वनात जाण्यास तयार झाले. त्यांचा एकच धर्म होता. भगवंतास अनुकूल राहाणे.

या प्रकारे आपणही भगवंतास शरण जावे. प्रल्हाद भगवंतास

शरण गेले तर त्यानी पित्याची आज्ञा मानली नाही, तरी पाप लागले नाही. भरतांनी भगवंताच्या प्रेमासाठी आपल्या मातेच्या वचनांना मानले नाही, राज्याचा त्याग केला.

भगवंतासाठी मनुष्य सर्वस्वाचा त्याग करू शकतो. भगवान तर म्हणतात की सर्व सोडून मला शरण ये. भगवद्‌भक्तिसाठी माता, पिता, गुरु, पति यांचीही आज्ञा मोडली तरीही काही आपत्ती नाही. भगवंताच्या भक्तित बाधा आणणाऱ्याविषयी तुलसीदास म्हणतात—

**जरउ सो संपति सदन सुखु सुहृद मातु पितु भाइ।**
**सनमुख होत जो राम पद करै न सहस सहाइ॥**

ही प्रेमाची गोष्ट आहे. प्रेमापुढे नीति गौण ठरते. नीति ही आहे की—

**अनुचित उचित बिचारु तजि जे पालहिं पितु बैन।**
**ते भाजन सुख सुजस के बसहिं अमरपति ऐन॥**

माझ्याकडून महापुरुषांची सेवा विशेष घडलेली नाही पण वार्तालाप, दर्शन, भाषण, चिन्तन, प्रणाम यांचा प्रसंग आला. माझी जशी श्रद्धा होती तिला अनुसरून लाभही झाला. म्हणून ही गोष्ट युक्ति संगत आहे असे कळून येते. संगाचा परिणाम प्रत्यक्ष होतो. रोग्याच्या संगाने रोगी, भोग्याच्या संगाने भोगी, आणि योग्याच्या संगाने मनुष्य योगी बनून जातो. हे प्रत्यक्ष फळ आहे. या हाताने करा आणि त्या हाताने घ्या. भजन आणि सत्संगाचे प्रत्यक्ष फळ सांगितले जाते पण त्याचे प्रमाण श्रद्धा आणि प्रेमावर अवलंबून आहे. जितकी श्रद्धा प्रेम असेल तितकाच लाभ त्या व्यक्तीस मिळतो. सत्संगाची चर्चा चालू आहे त्यामुळे खूप भाव निर्माण होत आहे. सत्संगातून उठून गेल्यावर जसा ताप उतरावा त्या प्रमाणे भावही कमी कमी होतो; सदा

कायम राहात नाही. खूप जोराने भजन केले तर स्वाभाविक वैराग्य येईल. चित्ताची प्रसन्नता वाढली की वैराग्य तर होते पण नंतर कमी होऊ लागते. याचे कारण असे आहे की जोपर्यंत कंदील ठेवलेला असतो तो पर्यत प्रकाश राहातो. कुणी कंदील घेऊन गेले तर परत अंधार होतो. महापुरुषच कंदील आहेत.

सर्वश्रेष्ठ तर भगवानच आहेत परन्तु भगवंतानीच भक्तांची प्रशंसा केली आहे. भगवान स्वतः तर भक्तीचा प्रचार करीत नाहीत, भक्तच प्रचार करतात. भगवंताला काम साधावयाचे होते म्हणून भक्तांची प्रशंसा केली. आपणही तेच करू या. ज्याच्याकडून काम साधावयाचे असेल त्याची खूप प्रशंसा करू या. भगवंतानीच आम्हांला ही चलाखी शिकविली आहे. हा विनोद आहे, खरे तर भगवंताजवळ कुठलीही चलाखी नाही. भगवान आपल्या भक्तांची प्रशंसा प्रेमामुळेच करतात. असे म्हणणे की लोभ दाखवून त्यांना फसवितात हा विनोद आहे.

भगवंतांची परीक्षा फार कडक असते, पण त्यातही त्यांची अहैतुकी दया असते. मुलाला फोड झाला तर आई वडील कापून काढतात ही त्यांची दयाच असते.

मयूरध्वजाचा मुलगा रतनकुँवर होता. भगवंतानी साधुच्या वेषात येऊन सांगितले की-याला चिरून मला दे. मनुष्य या प्रकारचा व्यवहार कधी करेल काय, किती निर्दयता आहे पण यातही दया आहे. त्याला चिरू लागल्यावर शरीराच्या ज्या भागाचे दान झाले नव्हते त्या भागांतून अश्रू गळू लागले. ते पाहून भगवान म्हणाले मला अर्धे शरीर नको आहे कारण हे बालक रडते आहे. राजाने समजावून सांगितले की शरीराच्या या भागातून अश्रू यासाठी येत आहेत की शरीराचा हा हिस्सा ब्राह्मणाच्या सेवेत कामी येत नाही. ते स्वतःही भगवंताची दयाच

मानीत होते. शेवटी भगवान प्रसन्न झाल्यावर वर मागितला तो हा की भविष्यात कुणचीही अशी घोर परीक्षा कधी घेऊ नका. कलियुगात तर अशा परीक्षेत सर्व नापासच होतील.

मी तर स्पष्ट सांगतो की मी तर परीक्षेत पदोपदी नापासच आहे. हा घोर कळिकाळ आहे, तुझे नाव पतितपावन आहे हे ऐकून मी तुझ्या दरवाजा वर आलो आहे. परीक्षा घेशील तर मी नापास होईन. जो अभिमान बाळगतो की मी परीक्षा देऊ शकतो तोच परीक्षेस पात्र असतो-पण तो (परमात्मा) पदोपदी परीक्षा घेतच राहातो, त्याचा तो स्वभाव बनला आहे. मासिक, दैनिक परीक्षा होत असते. त्याप्रमाणे भगवानही परीक्षा घेत असतात.

गुरु गोविन्दसिंहाच्या पुत्रांनां भगवन्तांनी भिंती मध्ये चिणवले ही विशेष दया आहे. आपणही हर घडी तयारच असतो. आम्ही तर भगवंताचेच चेले आहोत.

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।**
**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति॥**

(गीता १५ । ७)

या देहात हा सनातन जीवात्मा माझाच अंश आहे. आणि तोच या प्रकृतिमध्ये स्थित मन आणि पाच इन्द्रियांचे आकर्षण करतो.

बाप जसे काम करेल तर मुलगाही तेच करेल. इतके अंतर आहे की त्याची परीक्षा ठीक असते पण आपल्या परीक्षेत गडबड-घोटाळा असतो. आपल्यापाशी जे कोणी येतात त्याना आपण कसोटीवर कसून घेतो परन्तु ती कसोटी खोटी आहे. आम्ही सर्वज्ञ नाही भगवान सर्वज्ञ आहेत. पण आपण सर्वांची परीक्षा करीत असतो, ही सवय आहे. हर घडी

क्षणोक्षण आपण माझी परीक्षा घेत असता आणि मी तुमची परीक्षा घेत असतो.

श्रद्धा सर्वांची सदा एक सारखी राहात नाही. याचे काय कारण आहे ? आतां एक समज करता. थोड्या वेळानंतर दुसरेच समजता. कस लावण्याची इच्छा असते पण कसोटी खोटी आहे. ज्यावेळी सदाचार, गुण यावर दृष्टी पडते तेव्हा श्रद्धा उत्पन्न होते, अवगुणांकडे पाहिले की श्रद्धा कमी होते.

जीव अल्पज्ञ आहे. पदोपदी चूक होतच असते. कसोटी वेगवेगळी असते. एक नम्बरची कसोटी भगवंताची आहे, तिच्यामध्ये फरक पडत नाही. नम्बर दोनची कसोटी भगवत्प्राप्त पुरुषांची आहे. हिच्यामध्ये थोडा फरक पडत असतो. तीन नम्बरची सर्वसाधारण तसेच आपली आपल्यासाठीच कसोटी आहे. हिच्यामध्ये नव्याणव टक्के फरक पडतो; हां आपण आपल्यासाठी कल्पना करतो त्यातही थोडा फरक पडत असतो.

शास्त्रात ईश्वर-प्राप्तीचा उपाय सुगम आहे असे सांगितले गेले आहे. दुसऱ्या दृष्टीने पाहिले तर तो फार कठीण वाटतो. प्रत्येक मनुष्यमात्रात प्रत्येक कामासम्बन्धी दोन दृष्टिकोन असतात. आपण विचार करतो की साधनाच्या विषयी असे करू, हे करू त्यावेळी ते अगदी सरळ वाटत असते. त्या कामास ज्यावेळी आरंभ करतो त्यावेळी ते कठीण वाटू लागते. सत्य-पालनाची गोष्ट करण्यात, ऐकण्यात सुगम वाटत असते प्रत्यक्ष आचरणात आणणे कठीण असते. जास्त विचार केला तर वज्राप्रमाणे कठीण वाटते. भगवंताच्या उपदेशाकडे पाहिले तर फुलाप्रमाणे सोपा सरळ वाटतो याकडे लक्ष्य द्या—

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥**

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि॥**

(गीता ४ । ३४-३५)

ते ज्ञान तू तत्त्वदर्शी ज्ञान्यांच्या जवळ जाऊन समजून घे. त्यांना (उत्तम प्रकारे) प्रेमादराने दण्डवत-प्रणाम करण्याने, त्यांची सेवा करण्याने आणि कपट सोडून सरलतापूर्वक प्रश्न केल्याने ते परमात्मतत्त्वास उत्तम प्रकारे जाणणारे ज्ञानी महात्मा तुला त्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करतील.

जे जाणले असता परत तुला अशा प्रकारे मोह होणार नाही तसेच हे अर्जुना! त्या ज्ञानाच्या द्वारे तू सम्पूर्ण भूतांना निःशेष भावाने प्रथम आपल्या ठिकाणी आणि नंतर मी जो सच्चिदानंदघन परमात्मा त्याच्या ठिकाणी पाहाशील.

तीन गोष्टी सांगितल्या-साष्टांग प्रणाम करा, सेवा करा आणि संभाषण करा. संभाषण करणे किती साधी गोष्ट आहे, प्रत्यक्ष आचरणात आणणे फार कठीण आहे. मुलांना नित्य सांगितले जाते की आईवडीलांना प्रणाम करावा तर त्यांना त्या मध्ये लाज वाटते. माता-पित्यांनी पालनपोषण केल्याने तुम्ही मोठे झाला आहात, सेवेची गोष्ट तर दूरची राहिली प्रणाम करण्यातही लाज वाटते. असे करणारा अस्सल रजवीर्यापासून उत्पन्न झालेला नाही. त्याला काय कधी भगवंताची प्राप्ती होऊ शकते?

मनुने म्हटले आहे—माता, पिता-आचार्य यांची सेवा हाच परम धर्म आहे, बाकी धर्म उपधर्म आहेत. नित्य उठल्यावर त्यांच्या चरणी प्रणाम करावा. श्रुति म्हणते, **मातृदेवो भव**, प्रथम **पितृदेवो भव** म्हटलेले नाही. कारण की संततिच्या पालन-पोषणात माता जितके कष्ट सहन करते तितके दुसरे कुणी सहन

करीत नाही. माता-पित्याच्या सेवेनेही उद्धार होऊ शकतो स्त्रीचे पतिच्या सेवेने कल्याण होऊन जाते.

स्वार्थत्यागाने परमात्मप्राप्ती होते ही गोष्ट ऐकायला किती सोपी वाटते, परन्तु प्रत्यक्ष प्रसंग पडल्यावर फार कठीण वाटू लागते. आपला स्वभाव बाधा आणतो. विवेकी पुरुषालाही इन्द्रिये कुमार्गात घेऊन जातात.

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः।**
**इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः॥**
**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः।**
**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥**

(गीता २।६०-६१)

हे अर्जुना! आसक्तीचा नाश झाला नाही तर ही हावऱ्या स्वभावाची इन्द्रिये यत्न करूनही बुद्धिमान पुरुषाच्या मनास बळाने खेचून नेतात.

म्हणून साधकाने असा प्रयत्न करणे आवश्यक आहे की त्या सम्पूर्ण इन्द्रियांना वश करून समाहितचित्त होऊन भगवत्परायण होऊन ध्यानास बसावे. कारण ज्या पुरुषाची इन्द्रिये त्यास वश झालेली असतात त्याचीच बुद्धि स्थिर होऊन राहाते.

इन्द्रिये ज्या विषयाकडे धाव घेतात तेथून त्यांना हटवून आणि मनाला वश करून तू मत्परायण हो. भगवंतास शरण जाण्याने इन्द्रिये स्वतःच वश होतील. याहून सरळ उपाय नाही. मन वश करण्यासाठी महर्षि पतंजलीने अभ्यास आणि वैराग्य हे दोन उपाय सांगितले आहेत. शेवटी सरळ उपाय सांगितला—**ईश्वर प्रणिधानाद्वा**.

आपल्या स्वभावाचा विचार केलातर आपला उद्धार होणे फार कठीण वाटते, भगवंताकडे लक्ष गेले आणि त्यांच्य स्वभावाचा विचार केला की अत्यंत सुगम वाटते.

**जौं करनी समुझै प्रभु मोरी। नहिं निस्तार कलप सत कोरी॥**
**जन अवगुन प्रभु मान न काऊ। दीन बंधु अति मृदुल सुभाऊ॥**
**मोरे जियँ भरोस दृढ़ सोई। मिलिहहिं राम सगुन सुभ होई॥**

आपण आपल्या आचरणाकडे पाहिले तर उद्धार होण्याचा काही मार्गच नाही, भगवंताच्या दयेकडे पाहिले तर उद्धार फार सुगम आहे

भगवान म्हणतात—

**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति॥**

(गीता ५।२९)

मला सम्पूर्ण भूतांचा-प्राणिमात्रांचा सुहृद अर्थात स्वार्थरहित दयाळू आणि प्रेमी असे तत्त्वतः जाणून मनुष्य शान्तीला प्राप्त होतो.

म्हणून भगवंतास शरण जाणे हाच उपाय आहे. भगवान भक्ति करणाराच्या दोषांकडे दृष्टि उचलून पहातही नाहीत. कोणी आपली आज्ञा पालन करणारा असेल आणि त्याने आपल्याला समजा दोन गोष्टी सुनावल्या तर आम्ही काही बोलत सुद्धा नाही, ही विषमता झाली. भगवानही या विषमतेपासून वाचू शकत नाहीत. भगवान आपल्या दासांच्या दोषांकडे का बघत नाहीत? '**दीन बंधु अति मृदुल सुभाऊ।**' म्हणून! ही भगवंताची विषमता नाही हे भूषण आहे.

सार हे आहे की भगवंतास शरण गेले पाहिजे. कलियुगात सर्वांसाठी एकच साधन आहे की भगवंताची भक्ती करावी. मग वाटल्यास मनास वश करण्यासाठी असो, पापांच्यानाशासाठी असो अथवा भगवंताच्या प्रेमा साठी असो, बस भक्ती करा!



# भगवान कसे वश होतील?

## (कसे पकडले जातील?)

आजचे प्रकरण आहे भगवान कसे पकडले जातील. शास्त्रात यासाठी अनेक उपाय सांगितले गेले आहेत. भगवंतानी गीतेमध्ये ही गोष्ट विशेष रूपाने सांगितली आहे. तसे तर गीतेत योग, ज्ञान, भक्ति सर्वांबद्दल सांगितले गेले आहे परन्तु जेथे सुगम शब्द आला आहे तेथे तो भक्तिच्या सम्बन्धीच आला आहे.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः॥**

(गीता ८।१४)

जो पुरुष निरन्तर माझे चिन्तन करीत माझी भक्ती करतो त्याच्यासाठी मी सुलभ आहे अर्थात त्याला माझी प्राप्ती सहजच होते.

भगवंतांनी ९ व्या अध्यायात भक्तिचाच उपदेश केला आहे. ही राजविद्या आहे. अत्यंत गोपनीय (गुह्य) गोष्ट आहे. तिच्यासारखे दुसरे काही पवित्र नाही, ती उत्तमातही उत्तम आहे, प्रत्यक्ष फलरूप आहे. करण्यासही सुलभ आहे.

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम्।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्॥**

(गीता ९ । २)

हे विज्ञानासहित ज्ञान सर्व विद्यांचा राजा, सर्व गोपनीयांचा राजा, अति पवित्र, अति उत्तम, प्रत्यक्ष फल देणारे धर्मयुक्त साधन करण्यात अत्यंत सुगम आणि अविनाशी आहे.

जर अशी गोष्ट आहे तर सर्व लोक या साधनाचा उपयोग का करीत नाहीत?

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि॥**

(गीता ९।३)

हे परन्तप! या उपर्युक्त धर्मामध्ये श्रद्धारहित पुरुष मला प्राप्त न होता मृत्युरूप संसारचक्रात भ्रमण करीत राहातात.

भगवान सांगतात—

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः॥**

(गीता ९।३४)

माझ्यात मन असणारा हो, माझा भक्त बन, माझी पूजा करणारा हो, मलाच प्रणाम कर. या प्रकारे आत्म्याला माझ्या ठिकाणी नियुक्त करून मत्परायण होऊन तू मलाच प्राप्त होशील.

या आधी आणखी गोष्टी सांगितल्या आहेत, येथे सार सांगितले आहे. तू माझ्या मध्ये मन लावणारा हो, कारण की जो माझ्या ठिकाणी मन लावतो त्याचा योगक्षेम मी वहन करतो चालवतो. यात चार गोष्टी सांगितल्या आहेत. माझ्या ठिकाणी मन लावणारा हो, माझा भक्त बन, माझे पूजन कर, मला नमस्कार कर. या प्रकारे केल्याने मलाच प्राप्त होशील. हीच गोष्ट भगवंतानी अठराव्या अध्यायात पुन्हा सांगितली—

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥**

(गीता १८।६५)

हे अर्जुना! तू माझ्या ठिकाणी मन असणारा हो, माझा भक्त बन, माझे पूजन करणारा हो आणि मलाच प्रणाम कर. असे

करण्याने तू मलाच प्राप्त होशील. हे मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतो, कारण तू मला अत्यन्त प्रिय आहेस.

पूर्वी ज्या चार गोष्टी सांगितल्या त्याच येथे पुन्हा सांगून त्याचे फल सांगितले की तू मलाच प्राप्त होशील, मी सत्य प्रतिज्ञा करतो. किती जोराने या चार गोष्टी सांगितल्या आहेत.

**मन्मना भव**—मनाला भगवंताच्या ठिकाणी लावावे. तुझे मन संसारातील पदार्थाकडे जात आहे त्याला माझ्याकडे लाव.

**मद्भक्तः**—माझा भक्त भक्तिभावपूर्वक प्रेमात व्याकुळ होऊन फक्त माझ्यावरच प्रेम करणारा हो.

**मद्याजी**—माझे पूजन कर.

**मां नमस्कुरु**—मलाच नमस्कार कर.

या चारी गोष्टींचे पालन-केल्याने परमात्मप्राप्ती होईल यात विशेष काय आहे? एका गोष्टीनेही भगवंताची प्राप्ती होते. केवळ आमचे मन भगवंताच्या ठिकाणी लागले तरी परमात्मा प्राप्त होईल. ही गोष्ट शास्त्रसम्मत आणि युक्तिसंगत आहे.

गीता, भागवत, महाभारत, रामायण यात ठिकठिकाणी ही गोष्ट दिसून येते. भगवंताच्या स्मरणाने भगवंताची प्राप्ती होऊन जाते. महर्षि पतंजलि म्हणतात की— **ईश्वर प्रणिधानाद्वा।**

ईश्वराची भक्ती करण्यामुळे मन वश होते.त्यांच्या नामाचा जप आणि अर्थाची भावना केली पाहिजे. ॐ चा जप करावा पण असे समजता कामा नये की एक हेच भगवंताचे नाम आहे. तुम्हाला इच्छा असेल त्या नामाचा जप करा. रामायणात रामनामाचा, भागवतात कृष्णनामाचा वेदांमध्ये ॐ चा महिमा वर्णन केला आहे. गायला गेला आहे. सर्व नावे परमात्म्याला लक्ष्य करणारी आहेत. महर्षि पतंजलि ॐ चे

उपासक होते म्हणून त्यानी असे म्हटले. गीते मध्ये तर भगवंतानी जागो जागी म्हटले आहे—

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥**

(गीता ९ । २२)

जे पुरुष माझे अनन्य चिन्तन करतात त्यांचा योगक्षेम मी चालवितो.

वहन करणे याचे तात्पर्य हमाला प्रमाणे भार वाहाणे असा आहे कां? भगवान हमाला सारखे बनतात. ही प्रेमाची बाब आहे. आईवडिलांनी बालकाचा भार वाहिला तर त्यात काय हानी आहे?

आपण अगदी इन्द्र सुद्धा झालो परन्तु भगवंताची प्राप्ती झाली नाही, परमात्म्याची प्राप्ती कधी झाली नाही. त्या अप्राप्ताची प्राप्ती होणे याचे नाव योग आहे. जे प्राप्त आहे त्याचे रक्षण याचे नाव क्षेम आहे. भगवान सांगतात माझा भक्त जेथ पर्यंत पोहोचला असेल तेथ पर्यंत त्याचे रक्षण करतो आणि त्यास पुढे घेऊन जातो. अनन्य चिन्तनाने भगवान मिळतात याची अनेक उदाहरणे आहेत. ध्रुवाने भगवंताचे ध्यान केले त्याला भगवंताची प्राप्ती झाली. ध्रुवाची कथा प्रसिद्ध आहे.

ज्या प्रमाणे कुणी भगवान विष्णुचे ध्यान करतो तर कुणी कृष्णाचे ध्यान करतो, दोन्ही एकच आहे. भगवान आपल्या भक्ताच्या इच्छे-प्रमाणे या संसारात तेच रूप धारण करून येतात. ज्या रूपाची भक्त उपासना करतो त्याच रूपात भगवान त्याला दर्शन देतात. केवळ त्यांच्या ठिकाणी मन लावल्यानेही भगवान दर्शन देतात. असे ध्यान लावले पाहिजे की आपले आपल्यालाही भान राहाणार नाही भागवतात कथा आहे—

दत्तात्रेयांनी सांगितले आहे की ध्यान कसे लावावे हे मी बाण बनविणाऱ्या कारागिराकडून शिकलो. तो बाण बनवत होता, त्या वेळी राजाची सर्व सेना त्याच्या जवळून निघून गेली तरी त्याला पत्ता लागला नाही. ज्या प्रमाणे त्या कारागिराचे ध्यान बाण बनविण्यात लागले होते, तसेच आपले भगवंताच्या ठिकाणी लागले पाहिजे. ध्रुवाची अनन्य वृत्ति आहे. काम करीत असता भगवंताचे ध्यान करणे मुख्य वृत्ति आहे. व्यवहार करीत असता मुख्य वृत्तीने ध्यान केले पाहिजे. अनन्य वृत्तीने ध्यान करीत असता तुम्ही काम करू शकणार नाही.

ज्याप्रमाणे मासळीला जलातून काढली असता ती तडफडते, जलासाठी व्याकुळ होते, जिवंत राहू शकत नाही, ती जलाची इच्छा करते. तिला जल हवे असते; तिच्या हृदयात जलवास करीत असते, त्याप्रमाणे केवळ भगवंताच्या ठिकाणी मन लावल्यानेच परमात्म्याची प्राप्ती होऊ शकते. आपण आपल्या जीवनाचीही पर्वा करू नये. भगवंताच्या ठिकाणी मन लावावे भगवान म्हणतात—

**देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि॥**

(गीता ७। २३)

देवतांची पूजा करणारे देवतांना प्राप्त होतात आणि माझे भक्त कशाही प्रकारे मला भजू देत शेवटी ते मलाच प्राप्त होतात.

भाव हा आहे की तू माझा भक्त बनून जा. संसारात महत्त्वाची कुठली गोष्ट असेल तर ती प्रेम हीच आहे. भगवंताचे विस्मरण होण्यामुळे व्याकुळ व्हावयास हवे, ज्याप्रमाणे गोपी व्याकुळ होत असत. प्रेमामुळे वाणी गद्‌गद् होते, अश्रुपात होऊ लागतो, रोमांच उभे राहतात.

महाराणी सीतेकडे पहा, वारंवार मरावयास तयार होत होती,

भगवंताचेच ध्यान लागलेले होते. या प्रकारे भगवान ही सीतेसाठी व्याकुळ होत होते.

राजा नळ दमयन्तीस सोडून निघून गेले. ती आपल्या पतीच्या वियोगाने तळमळत तडफडत होती तशी दशा भगवंताच्या वियोगात होईल तर लवकरच भगवान भेटतील. ज्याचे असे प्रेम असेल त्याचा एक क्षणभरही वियोग होऊ शकत नाही. जरी ते भगवान सर्वत्र विराजमान आहेत तरी जेथे त्यांच्या नामाचे कीर्तन होत असते तेथे ते विशेषरूपाने राहातात. या प्रकारे भगवंतास सर्वत्र पाहून प्रसन्न व्हावे, त्यांच्या ठिकाणीच प्रेम केले पाहिजे, या प्रकारे केल्याने भगवान भेटतात. त्यांची प्राप्ती होते

**मद्याजी**—केवळ भगवंताच्या पूजेनेही भगवान मिळतात. सर्व प्राण्यांना भगवान समजून त्यांची सेवा करणे हीच भगवंताची पूजा आहे.

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः॥**

(गीता १८।४६)

ज्या परमेश्वरापासून सम्पूर्ण प्राण्यांची उत्पत्ति झाली आहे, ज्याच्या योगे हे समस्त जग व्याप्त आहे त्या परमेश्वराची आपल्या स्वाभाविक कर्मांच्या द्वारा पूजा करून मनुष्य परमसिद्धिला प्राप्त करतो.

दूसरी पूजा भगवंताच्या स्वरूपाची, विग्रहाची होत असते अथवा मानसिक पूजा करावी. हे अनेक उपाय आहेत. पूजा प्रेमाने केली पाहिजे. ही पण पूजा आहे—

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥**

(गीता ९।२७)

हे अर्जुना! तू जे कर्म करतोस, जे खातोस, जे हवन करतोस, जे दान देतोस आणि जे तप करतोस ते सर्व मला अर्पण कर.

केवळ भजनानेही भगवंताची प्राप्ती होऊन जाते.

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति॥**

(गीता ९।३०-३१)

जरी कोणी अतिशय दुराचारीही अनन्यभावाने माझा भक्त होऊन मला भजत असेल तर तो साधूच मानणे योग्य आहे; कारण त्याने यथार्थ निश्चय केलेला आहे. अर्थात त्याने उत्तम प्रकारे निश्चय केलेला आहे की परमेश्वराच्या भजनाच्या सारखे श्रेष्ठ दुसरे काहीही नाही.

तो लवकरच धर्मात्मा होऊन जातो, माझ्या भक्ताचा कधी नाश होत नाही., माझे भजन करणारा कसाही पापी असला तरी तो लवकरच परम शान्तिला प्राप्त होतो. भगवंतानी प्रथम आठ विशेषणे देऊन प्रशंसा केली आहे.

**राजविद्या**—हा सर्व विद्यांचा राजा आहे.

**राजगुह्य**—माझे भजन झाले पाहिजे ही अत्यंत गुप्त गोष्ट आहे. आपल्या घरातल्या गोष्टी आपण सर्वांना सांगत नाही, जो कोणी अंतरंग मित्र असतो त्यालाच आपण सांगतो 'मला भज' हे राजगुह्य आहे.

**पवित्रम्**—अपवित्र वस्तूलाही जे पवित्र करते त्याला '**पवित्रम्**' म्हणतात. भगवान म्हणतात-अतिशय दुराचारीही लवकरच धर्मात्मा होऊन जातो.

**उत्तमम्**—याहून उत्तम दुसरे काय असणार आहे?—

**'यो मामेवमसम्मूढो जानाति पुरुषोत्तमम्'**। सर्वाहून उत्तम पुरुषोत्तम आहे. जो मला भजतो तो मलाच प्राप्त होतो.

**प्रत्यक्षम्**—माझ्या भक्तिचे फळ परलोकी मिळेल अशी गोष्ट नाही. येथेच तुम्हाला शान्ति मिळेल, शान्ति ही कशी तर परम शान्ति. **'क्षिप्रं भवति धर्मात्मा'**.

**धर्म्यम्**—याहून श्रेष्ठ कुठलाही धर्म होऊ शकत नाही.

**अव्ययम्**—**'कौन्तेय! प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति.** माझ्या भक्तांचा कधीही नाश होत नाही.

**सुसुखम्**—दुसरे काही जमत नसेल, पण भगवंताच्या नामजपांत काय परिश्रम आहेत, याहूनही सुगम सुलभ काय असू शकेल?

**मद्याजी—पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥**

(गीता ९। २६)

जो कोणी भक्त माझ्यासाठी प्रेमाने पत्र, पुष्प, फल, जल आदि अर्पण करतो त्या शुद्धबुद्धि निष्काम प्रेमी भक्ताने प्रेमपूर्वक अर्पण केलेले ते पत्र-पुष्पादि मी सगुणरूपाने प्रकट होऊन प्रीतिसहित खातो.

येथे स्पष्ट सांगत आहेत की मी येऊन खातो. ते प्रेमाने मागून घेऊन खातात, ओढून घेऊन खातात. दुर्योधनाच्या सभेत महाराज कृष्णचन्द्रजी गेले दुर्योधनाने म्हटले-आपण आमच्या वस्तूंचा स्वीकार का करीत नाही? महाराज कृष्णचन्द्रानी सांगितले-फक्त दोनच प्रसंगी कुणी दिलेली वस्तू ग्रहण केली जाते, एकतर जेथे प्रेम असते अथवा जेथे आपत्ती असते. प्रेम तुझ्या ठिकाणी नाही आणि माझ्यावर आपत्ती आलेली नाही. तू माझे सांगणे ऐकलेस तर मी तुझे आतिथ्य स्वीकारीन. विदुराच्या घरी भगवान न बोलावताही जातात. पुराणातील गोष्ट आहे.

विदुरांच्या घरी भगवान गेले, आणि हाक मारू लागले. विदुरांची पत्नी स्नान करीत होती. भगवंताची वाणी ऐकून आवाज ऐकून तिला भान राहिले नाही. नग्नच बाहेर आली. भगवंतानी आपलापीतांबर तिच्यावर टाकला. घरात केळी होती, त्याची साले ती भगवंतास खाऊ घालू लागली. विदुरजी घरी आले त्यानी पाहिले हे काय चालले आहे? नंतर भगवंतास केळे देऊ लागले. भगवंतानी म्हटले हे तितके गोड नाही!

एकेकाची कित्येक उदाहरणे मिळतात.

**पत्र**—द्रौपदी, **पुष्प**-गजेन्द्र, **फळे**-शबरी, **तोयं**-राजा रन्तिदेव. **मां नमस्कुरु**—केवळ प्रणाम करण्यानेही भगवान प्रसन्न होतात. भगवान श्रीकृष्णास एक वेळ केला गेलेला प्रणाम दहा अश्वमेध यज्ञाहून श्रेष्ठ आहे. भगवंतास प्रणाम करणारा संसारांत परतून येत नाही—

**एकोऽपि कृष्णस्य कृतः प्रणामो**
**दशाश्वमेधावभृथेन तुल्यः।**
**दशाश्वमेधी पुनरेपि जन्म**
**कृष्णप्रणामी न पुनर्भवाय॥**

(भीष्मस्तवराज ९२)

भगवान श्रीकृष्णास एक वेळ जरी प्रणाम केला तरी दहा अश्वमेध यज्ञाप्रमाणे फल प्राप्त होते. दहा अश्वमेध करणारा तर पुनर्जन्म पावतो परन्तु भगवंतास प्रणाम करणारा सदा सर्वदा संसाराच्या आवागमनापासून मुक्त होऊन जातो ही विशेषता आहे.

जर म्हणाल की आम्ही तर नित्य प्रणाम करीत असतो आमचे कल्याण झालेले नाही. आपण निराश का होता? मेल्यानंतर जर आपण परत जन्मास आलो तर मग आपल्याला निराश व्हावे लागेल.

या प्रकारे भगवंताच्या भक्तीचा महिमा आहे. श्रद्धा प्रेम असेल तर भगवंतास प्रणाम करण्याने या जन्मात या क्षणी भगवत प्राप्ती होऊ शकते. आदर, श्रद्धा, विश्वास यांचा विशेष महिमा आहे. यावरून ही गोष्ट सिद्ध झाली की अनन्य भक्तीने भगवान तात्काळ मिळतात. भक्तीचे एक जरी अंग आपल्यात असेल तर भगवान भेटतात त्यांची प्राप्ती होते. प्रल्हादानी पित्यास नवधा भक्ती सांगितली

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥**

याचा इतका महिमा आहे की याचे एक अंग जरी धारण केले गेले तरीही कल्याण होऊन जाते. हीच गोष्ट भगवंतास पकडण्याविषयी आहे. हृदयानेही ते पकडले जातात. जसे सूरदासांनी त्यांना पकडले होते—

**बाँह छुड़ाये जात हो निबल जानिके मोहि।**
**हिरदेसे जब जाहुगे तब पुरुष बदौंगो तोहि॥**

वाणीने पकडणे त्यांचे गुणगान करणे आहे, त्यानेही ते पकडले जातात. भगवंताचे चरण आपण पकडले तर ते हातांनी पकडणे आहे. भगवंताचे गुण ऐकणे हे कानानी पकडणे आहे. हातांनी सेवा करावी. शरीराने साष्टांग प्रणाम करावा. मन, वाणी, शरीर, इन्द्रिये सर्वांनी भगवंतास पकडावे. आपण वाटल्यास मनाने पकडा अथवा शरीराने पकडा, सर्वांमध्ये प्रेम आवश्यक आहे.



# केवळ भगवंताच्या आज्ञेचे पालन करण्याने अथवा स्मरणाने कल्याण

केवळ आज्ञापालन करण्यानेही कल्याण होऊ शकते आणखी कुठलीही अट नाही. आज्ञापालनाने श्रद्धा प्रेम स्वतःच उत्पन्न होतात. केवळ भगवतस्मरण करण्यानेही कल्याण होऊन जाते.

ऐकावे आणि ऐकले असेल त्याप्रमाणे वागावे, भगवंताच्या विधानात प्रसन्न होऊन राहावे. आपण भजनाला वेठबिगार समजतो, भजन भाररूप वाटते. भगवान ही समजतात की हे बिचारे भजन आणि ध्यानास घाबरत आहेत.

प्रल्हादाने म्हटले आहे—तुम्ही जे सांगाल ते मी मानू शकतो पण भगवंताचे भजन सोडू शकत नाही.

संसारात कित्येक उदाहरणे अशी मिळतात की ज्या कामाचे महत्त्व आपल्या मनांत आपण मानलेले असते त्यासाठी मनुष्य सर्व काही सोडू शकतो; पण त्या कामास सोडू शकत नाही. या प्रकारे जर भगवंताविषयी होऊन जाईल की बाकी सर्व काही सोडू शकतो पण भगवंतास सोडू शकत नाही तर कल्याण होऊन जाईल. धनासाठी घरातील माणसांना लोक सोडू शकतात. धनाला जितके महत्त्व देतात, तितके भगवंताला देत नाहीत. जर असे झाले की भगवंतासाठी एखादी व्यक्ती रुपये, स्त्री सर्वास सोडू शकते. तर समजले पाहिजे की भगवंतास महत्त्व दिले आहे.

मनुष्य लहान बनण्याची इच्छा करीत असेल तर त्यात काही अडथळा येत नाही, मोठे बनण्यातच अडथळा आहे. आपण तर जितक्या गोष्टी बोलतो लहान बनण्याच्याच बोलतो. जर आपण सर्वांकडून आपल्याला प्रणाम करवून घ्यावा असे म्हणू तर ती

गोष्ट आपल्या हातातील नाही पण आपण दुसऱ्यांना प्रणाम तर करूं शकतो.

मानसिक प्रणाम करण्यात दम्भ, अश्रद्धा यांचा जराही संभव नाही. मनाने ईश्वराची भक्ती केली तर तेथे दम्भ कोठून घुसेल ? उत्तम मानसिक भावात दम्भ आदि घुसू शकत नाहीत.

केवळ नामजप, केवळ आज्ञापालन, केवळ भगवंताच्या विधानात संतोष मानण्याने भगवत प्राप्ती होऊन जाते. जर भगवंताच्या आज्ञेचे पालन करू शकत नसलो तरीही ज्याच्या आज्ञेचे पालन करायचे त्याचा ज्या गोष्टीत अधिकार असेल त्या गोष्टीची प्राप्ती तर होऊन जाते.

योगी बनण्यासाठी योग्याच्या आज्ञेचे पालन केले तर योगी बनू शकता. ज्या उद्देश्याच्या सिद्धिसाठी ज्याची आज्ञा पाळली जाते, त्याच्या अधिकारात ती वस्तु असेल तर ती प्राप्त होऊ शकते.

स्वामीच्या आज्ञेचे पालन कसे केले पाहिजे हे शंकरलाल गोयन्दका यांच्यापासून शिकू शकता. रुपयांसाठी आज्ञापालन करीत असतो. केवळ एकच गोष्ट असेल की स्वामी कशा प्रकारे संतुष्ट होतील तर त्याला मी आदर्श मानतो. रोकडीचे काम करीत आहे, रोकड जोडत आहे. मी म्हटले न्हाव्याला बोलाव. चटकन रोकड सोडून दिली आणि ते काम प्रथम केले. उदाहरण शिकण्यासारखे आहे.

कशा प्रकारे सर्वांना प्रसन्न करून आज्ञा पालन केले जाईल, हे त्याचेकडून शिकले पाहिजे. आपण त्याची ही सेवा पाहून मुग्ध होऊन जाल–शास्त्रात उदाहरण येते—छाये प्रमाणे संकेतास अनुसरून काम करीत असतो. चाळीस वर्ष सत्संग करूनही आमच्यामध्ये असा मनुष्य तयार झाला नाही. गुण घेणे ही सामान्य गोष्ट नाही.

मी जोर देऊन सांगू शकतो की जर कोणी भगवंताच्या प्राप्ती करता अशा प्रकारे आज्ञापालन करेल तर त्या कामाला जास्त दिवस लागणार नाहीत. कुणीही श्रेष्ठ पुरुष असो त्याच्या आज्ञेचे पालन करावे. परमात्म्याची प्राप्ति होण्यास योग्य पुरुष असेल त्याच्या आज्ञेचे पालन करावे.

धर्मपालनासाठी रुपयांची आवश्यकता नाही. नाही तर गरीब मनुष्य कशाप्रकारे धर्माचे पालन करू शकला असता.

भगवंताचे काम समजून काम करून प्रसन्न व्हावे. वीस लोक खुशाल निन्दा करोत, भगवंतास संतोष होतो. आपण भगवंताच्या निकट पोहोंचता आहात. भलेही लोकांना आपले काम वाईट वाटेल पण भगवान प्रसन्न असतील तर आपण भगवंताच्या निकट आहात.

कुणा दुकानदाराची नोकरी करत आहात. त्याला प्रसन्न करीत आहात तर रुपये मिळून जातील. त्याच दुकानदाराचे आज्ञापालन जर भगवंतासाठी कराल तर त्या भावामुळे त्याला परमात्म्याची प्राप्ती होईल. तो त्याच्या उत्तम भावामुळे पवित्र होऊन जाईल. खूप भाव उच्च असला पाहिजे. ही गोष्ट प्रत्यक्ष आहे.

मी तन, मन, धनाने सर्व प्रकारानी गीताप्रेसची सेवा करीन आणि फळाची इच्छा करीन की माझी कीर्ती व्हावी. सेवा गोष्ट तर फारच चांगली आहे पण परिणाम म्हणून काय मिळेल? मान, बढाई, प्रतिष्ठा!

एक गरीब माणूस आहे तो कशी सेवा करू शकेल, तो समय देऊ शकत नाही, शरीराने सेवा करू शकत नाही. तो भावाने सेवा करू शकतो. हे भगवंताचे काम आहे अशी त्याची भावना आहे. मान, बढाईची इच्छा नाही, लोकांचा उद्धार व्हावा हीच

त्याची नीयत आहे. कशाचीही इच्छा करणार नाही तर त्याला भगवंताची प्राप्ती होईल. केवळ मानसिक भावाने त्याचे कल्याण होऊन जाईल.

कोणी म्हणते की एकान्तात थोडा वेळ गोष्टी करू या. एकान्तात कशासाठी गोष्टी करणार? अशासाठी की समूहामध्ये गोष्टी करतांना विशेष गोष्टी बोलता येत नाहीत, एकान्तात होऊ शकतात. एकान्तात गोष्टी बोलूनही नीयत उच्च दर्जाची नसेल तर त्या गोष्टीही उच्च दर्जाच्या होत नाहीत.

कुठल्याही प्रकारे ज्यात स्वार्थाचा सम्बन्ध असेल ती गोष्ट नीच दर्जाचीच आहे. ज्यामध्ये जितका हृदयापासून अंत:करणापासून त्याग आहे ती गोष्ट तितक्या उच्च दर्जाची आहे, दुसऱ्या मनुष्याला पत्ताही लागता कामा नये. क्रियाही उच्च असावी भावही उच्च असावा तर परमात्म्याची प्राप्ती काही मिनीटात होऊन जाईल. क्रिया उच्च आहे पण भाव उच्च नाही तर वर्षे लागतील ह्या सर्व गोष्टी याच्या पोटांत अंतर्भूत आहेत—

**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्॥**

(गीता २।४०)

या कर्मयोगरूपी धर्माचे थोडेसे साधनही जन्ममृत्युरूपी महान भयापासून रक्षण करीत असते.



# सर्वत्र आनन्दाचा अनुभव करावा

भगवान आले! ते काय भगवान आले. या प्रकारे प्रतीक्षा केली पाहिजे. वाट पाहिली पाहिजे. सर्व प्रजा भगवंताचे विमान पाहून उड्या मारू लागली, नाचू लागली. सर्वांना आतुरता लागून राहिली आहे. सर्व जण अत्यंत उत्साहित झालेले आहेत. भगवान पहात आहेत की यांचे तर वैकुंठवासी लोकांहूनही अधिक प्रेम आहे. जसा चकोराचा समुदाय चन्द्रम्याकडे पहात राहातो तसे सर्व पहात राहिले आहेत. कष्टाचा त्यांना अगदी विसर पडला आहे. भगवंतानीही त्यांच्या भावनेस अनुसरून कार्य केले. एकाक्षणात सर्वांना भेटले.

**अमित रूप प्रगटे तेहि काला । जथाजोग मिले सबहि कृपाला ॥**
**छन महिं सबहि मिले भगवाना । उमा मरम यह काहुँ न जाना ॥**

एका क्षणात भगवान सर्वांना भेटले. अनन्तरूप झाले ज्याला भेटतात तो आनंदीत होत आहे. भगवान दोषांकडे लक्षच देत नाहीत. मग आपण दोषांकडे पाहून अनुत्साहित का व्हावे? निराश का व्होवे?

**जन अवगुन प्रभु मान न काऊ। दीन बंधु अति मृदुल सुभाऊ ॥**

भगवान अतिशय दयाळू आहेत. उद्धार करण्यासाठी सदैव तयार असतात. धूळीचे कण मोजता येतील पण आपले किती जन्म आत्तापर्यंत झाले आहेत याची गणना करणे कठीण आहे. भगवंतानी हा शेवटचा मनुष्यजन्म दिला आहे. फार मोठी दया केलेली आहे. भगवंताच्या या दयेचा स्वीकार आम्ही केला नाही म्हणजेच मनुष्य जन्माचे सार्थक केले नाही तर तो आमचा अत्यंत मूर्खपणा होईल. भगवान म्हणतात—

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः॥**

(गीता ७।१९)

अनेक जन्मानंतर शेवटच्या जन्मात तत्त्वज्ञानाची प्राप्ती झालेला पुरुष सर्व काही वासुदेवच आहे—या प्रकारे मला भजतो, असा महात्मा अत्यन्त दुर्लभ आहे.

मग आपण अज्ञानी का बनावे ? सर्वकाही परमात्मा आहे हे मानायला काय लागते ? या प्रकारे जो भजतो तोच महात्मा आहे. जर अशी गोष्ट आहे तर आम्ही सर्वांना परमात्माच का समजू नये ?

ही गोष्ट फक्त मनुष्यजन्मातच मानली जाऊ शकते, पशु, पक्षी आदि योनिच्यामध्ये हे समजण्याचे काही साधनच नाही. हनुमंतासारखी गोष्ट तर असंख्य कोटी जीवामध्ये क्वचित एखाद्याच्या बाबतीत धडते. या प्रकारची आशा न करता आपल्याला तर याच जन्मात या जन्मांतील थोड्याशा हिश्श्यातच भगवंताची प्राप्ती करून घेतली पाहिजे.

परमात्म्याच्या निराकार स्वरूपा संबंधी ही युक्ति समजून घेतली पाहिजे—

ढगाच्या बाहेर-आत सर्वत्र आकाश आहे. त्या ढगाप्रमाणे या दृश्य शरीरात सर्वत्र विज्ञानानन्दघन परमात्मा बाहेर-आत, वर खाली सर्वजागी परिपूर्ण भरून राहिलेला आहे. परमात्म्याच्या संकल्पाच्या आधारावरच ही सृष्टि आहे. आपण डोळे बंद करून घ्यावे. आपल्या आत-बाहेर, वर खाली आनन्दच आनन्द परिपूर्ण आहे असे समजून घ्यावे. आपण आनन्द आणि आनन्दाने परिपूर्ण आहोत. हे शरीर ब्रह्मापासूनच उत्पन्न झाले आहे, ते परब्रह्मातच स्थित आहे, आणि त्यातच लीन होऊन जाईल. ज्याप्रमाणे ढग आकाशापासून उत्पन्न होतो, त्यांतच स्थित असतो आणि त्यातच लीन होऊन जातो.

आनन्दरूपाने तो परमात्मा आपल्या बाहेर-आत परिपूर्ण आहे, आनन्दाशिवाय दुसरी कुठलीही वस्तुच नाही. हाच आनन्द आमोद-प्रमोद सुखाच्या रूपात येतो व्यक्त होतो आनन्द अत्यन्त सुखरूप आहे. त्या सुखाला कुठलीही सीमा नाही. आनन्दच-आनन्द आहे. आनन्दालाच ब्रह्म समजून उपासना केली पाहिजे. बुद्धीने निश्चय केला पाहिजे, मनाने मनन केले पाहिजे. त्या आनन्दाचेच नाव नारायण आहे. नारायण, नारायण, नारायण, आनन्दमय, आनन्दमयचे उच्चारण केल्याने कळून येते की जसा काही आनन्दाचा समुद्र उफाळून आला आहे, आनन्दाला भरती येत आहे. तो आनन्द अपार आहे, त्यात दुसरी कुठलीही वस्तु नाही म्हणून तो पूर्ण आनन्द आहे. तो शान्त आनन्द आहे, सम आहे तो इतका गहन अगाध आहे की त्याच्या शिवाय दुसरी वस्तुच अस्तित्वात नाही. तो जड नाही, चेतनस्वरूप आहे तो अनन्त आहे, त्याची सीमाच नाही. तो सर्व जागी समभावाने परिपूर्ण आहे. तो नित्य आहे, अचल आहे, अव्यक्त आहे, शुद्ध आहे, निर्विकार आहे.

असा आनन्द शरीराच्या बाहेर आत सर्व जागी परिपूर्ण आहे. शरीर चालत असेल तर ते आनन्दातच चालत आहे. आकाशाप्रमाणे आनन्द सर्व जागी आहे. साधनकालातही आनन्द आहे, सिद्धावस्थेतही आनन्दच आहे. शब्द, अर्थ, ज्ञान सर्व आनन्दच आहेत, आनन्दाशिवाय दुसरी कुठलीही वस्तूच नाही. हृदयात आनन्दाचाच अनुभव करावा, आनन्दाचेच उच्चारण करावे,. प्रत्यक्षातही. आनन्द, साधनातही आनन्द आणि फळातही आनन्दच आहे. सर्व भूत शरीरे अन्ती (शेवटी) आनन्दातच विलीन होऊन एक आनन्दच शिल्लक राहातो. ढग सर्व आकाशात विलीन होऊन एक आकाश तेवढे राहाते त्याप्रमाणेच एक आनन्द तेवढा राहातो. अशा ध्यानात मस्त होऊन चला.

सगुणाविषयी दुसऱ्या प्रकारे सांगितले जाते. आपण येथून उठू तेव्हा असे समजले पाहिजे की साक्षात भगवानच आपल्या बरोबर क्रीडा करीत आहेत. ज्याप्रमाणे रामरूपात प्रकट होऊन भावांच्या बरोबर क्रीडा केली होती, कृष्णरूपात गोपबालकां–बरोबर क्रीडा केली होती त्याप्रमाणेच आपल्याही बरोबर क्रीडा करीत आहेत. रमण म्हणा अथवा क्रीडा म्हणा, गोष्ट तर एकच आहे. ज्या प्रमाणे अत्यन्त प्रिय मित्राबरोबर खेळतात, हसत हसत बोलतात त्याप्रमाणे आपण भगवंताबरोबर खेळावे, हसत हसत बोलावे. झोपायचे असेल तर जवळ जवळ झोपावे, हसत असतील तर आपणही हसावे. सर्व क्रियामध्ये एक दुसऱ्याची नक्कल करावी. त्यांची वाणी फार आनन्ददायक आहे. ऐकताना शरीरात कम्प उत्पन्न होतो. हृदयरूपी सागरात भगवद्भावाच्या लहरी उठतात. नेत्रांनी मानसिक रूपांनी पहात राहावे फारच मधुर रूप आहे. समजावे की जणु नेत्रद्वारा मी रसास्वाद करीत आहे. त्या रूपास पहाता पहातांना, सुन्दर नेत्र, सुकोमल गाल, तसेच मंद–मंद हास्य पाहून फारच मधुर अमृतमय रसास्वाद मिळत आहे, जणु आपण नेत्रांच्या द्वारे अमृतपान करीत आहोत. स्पर्श करू लागलो की जाणवते कसा दिव्य स्पर्श आहे. स्पर्शाद्वारे अमृताचा आस्वाद मी घेत आहे. दिव्य गन्ध स्वाभाविक रीतीने आपल्या नासिकेच्या आत जात आहे. ते भगवान आपल्याकडे पहात आहेत. आपल्या प्रेममय दृष्टीच्या द्वारा आपल्याला प्रेमाने भिजवून टाकत आहेत ओलेचिंब करीत आहेत. त्या आनन्दाने आपण परिपूर्ण होत आहोत. ज्याच्या कडे भगवान कृपादृष्टीने पाहातात त्याला मग चिन्ता, भय, शोक, कोठून असणार?

प्रेमाच्या नजरेने पाहून आपल्याला प्रेमाने परिपूर्ण करीत आहेत. अशा प्रभुला हर घडी पहात राहावे. चन्द्रमा जसा

आपल्या प्रकाशाने शीतल करतो त्या प्रमाणे भगवान प्रेमरसाचा वर्षाव करीत आहेत. त्यामुळे सर्व रोम-रोम, मन, बुद्धि, सर्व भगवंताच्या प्रेमाने परिपूर्ण झाले आहेत. जणु कुणी जादू करून आपल्याला वशीभूत करून घेत आहे. प्रेमाच्या दोरीने असे बांधले आहे की आम्ही तिला सोडूही शकत नाही. बस, आमची हीच अवस्था सदा टिकून राहावी. आम्हाला कशाचीही आवश्यकता नाही. सदा प्रेम रस पीतच राहावे. आता आणखी एक गोष्ट ऐकविली जात आहे.

उपनिषदात जेथे तत्त्वाची गोष्ट सांगितली गेली आहे तेथे म्हटले आहे आणि तो विषय असा आहे की जर वाळलेल्या लाकडाला ऐकविले गेले तर ते सजीव व्हावयास हवे. आपणा मध्ये जे कुणी मृतप्राय झाल्यासारखे असतील त्यांच्यातही रस आला पाहिजे. भगवान श्रीकृष्ण जेव्हा प्रेमाने बांसरी वाजवीत तेव्हा लाकडेही चैतन्यमन्य होऊन जात, हिरवी होऊन जात. त्यांच्यातून धूर निघू लागे तर स्वयंपाक नीट होत नसे एक गोपी म्हणते—

**मुरहर रन्धनसमये मा कुरु मुरलीरवं मधुरम्।**
**नीरसमेधो रसतां कृशानुरप्येति कृशतरताम्॥**

ह्या भगवान श्रीकृष्णाच्या गोष्टी आहेत. आपल्या घरच्या तर नाहीत. मी तर टेपरेकॉर्डर प्रमाणे बोलत राहातो. सर्व भगवंताचीच वचने आहेत. काही सरळ आली आहेत, काहीत काही भर पडून आली आहेत. भगवंताची वचने आकाशवाणीतूनही उतरतात, महात्म्यांच्या वचनांतून उतरतात, शास्त्रांच्या द्वारेही उतरतात. आपण तर एवढेच जाणून घेतले पाहिजे की हे आहे तर भगवंताचे वचन, मग, रंग का चढत नाही? वस्त्र जितके साफ स्वच्छ असेल तितका त्याच्यावर छानसा रंग चढतो. थोडा रंग आमच्यावर

ही अवश्य चढतो, परन्तु एवढ्याने संतोष मानून उपयोगी नाही. रंग असा चढला पाहिजे की चमकू लागला पाहिजे. भगवद विषयक रंगात साबणही अतंर्भूत आहे, म्हणून वस्त्र मळलेले असले तरी वारंवार रगडल्याने मळास काढून टाकून कपडा साफ केला जातो. आणि मग त्याच्यावर एकदम रंग चढतो. जर असे म्हणाल की मग इतका विलंब का? तर गोष्ट हीच आहे की कपडा मळलेला आहे. भगवंताच्या तत्त्वरहस्याच्या गोष्टी हाच रंग आहे वारंवार त्यात डुबकी मारली पाहिजे. वेळोवेळी नामाचे उच्चारण म्हणजे साबण रगडणे आहे, त्यामुळे वस्त्र एकदम साफ होते आणि मग तात्काळ त्याच्यावर रंग चढतो.

चुंबक असतो तो जमीनीस लावला की लोखंडाचे परमाणु त्याच्या बरोबर येतात, त्याला चिकटतात. पण चुंबकाचा मसाला घासून तो साफ केला तर तो लोखंडाला पकडू शकत नाही. आपल्या हृदयात मळ आहे म्हणूनच ते विषयाकडे ओढ घेते. त्याला घासून साफ केले तर मग ते विषयांकडे जाऊ शकणार नाही.

प्रेम अथवा ज्ञानाच्या साबणाने घासून साफ केले तर ते परत मळाला स्पर्शही करणार नाही. लहान मूल त्याला जोपर्यत ज्ञान नसते तोपर्यंत घाणीकडे जाते. ज्यावेळी घृणा, तिरस्कार उत्पन्न होतो तेव्हा ते घाणीकडे जात नाही. पुन्हा पुन्हा घृणेची जाणीव करून दिल्याने एवढी घृणा निमार्ण झाली की ज्यांनी शिकविले त्यापेक्षाही तो जास्त घृणा करूं लागतो. या प्रमाणे ज्यावेळी विषयासम्बन्धी घृणा-तिरस्कार उत्पन्न होतो तेव्हां त्यांच्या ठिकाणी दुर्गंधी जाणवू लागते, तो त्यांच्या जवळही जाऊ शकत नाही. वैराग्याची नशा चढली म्हणजे तर इतर अत्तर वगैरे मूत्रासमान वाटू लागते. जितके म्हणून स्त्री आदि विषय आहेत, विष्ठा-

मूत्रात आणि त्यांच्यात काय अन्तर आहे? विष्ठे समानच ते आहेत. साक्षात आनन्दास सोडून घृणित, तिरस्करणीय पदार्थांकडे दृष्टी वळवणे मूर्खताच आहे. थोडे जरी ज्ञान झाले तरी तो जवळही जात नाही.

ज्यावेळी प्रभूच्या ठिकाणी प्रेम होते त्यावेळी त्यांना सोडून भक्त कुठे जाऊच शकत नाही. आनन्दाचेच प्रेमाच्या रूपात प्रादुर्भाव प्रकटीकरण होते. आनन्द, प्रेम हे त्याचेच मोठे रूप आहे. ढगच थेंब, गारा, बर्फ या रूपात आकाशात असतात. त्याप्रमाणेच तो आनन्दमय परमात्माच रस, आनन्द, सुख यांच्या रूपात परिणत होतो. त्या आनंदात बुडी मारल्यावर कोणी त्याला सोडू कसे शकेल? त्या भगवंताचा वियोग त्याला व्याकुळ करतो. मासळीला पाण्यातून बाहरे काढले आणि परत पाण्यात घातले म्हणजे तिच्यात पून्हा प्राणाचे संचारण होते.

भगवंताच्या तत्त्व-रहस्य-गुण-लीला यांची गोष्ट अशी आहे की एकदा त्यांचे ज्ञान झाल्यानंतर कुणी त्यांना सोडू शकत नाही. त्यांत बुडी मारली पाहिजे. साक्षात अलौकिक रूप आहे त्यात तन्मय झाले पाहिजे.

आपण जाणून घेतले पाहिजे की तो आनन्द, ते ज्ञान,तत्त्व, रहस्य, प्रभाव काय आहे? महान प्रभूचे साक्षात् निराकार स्वरूप हाच रंग आहे. रंगाच्या हौदात कपडा बुडवला की तो रंग कणा कणात-प्रविष्ट होतो, तसेच परमात्म्याच्या स्वरूपाची चेतनता, शान्ति आपल्यात प्रविष्ट झाली आहे. परमात्म्याच्या रंगात रंगून आपण तृप्त झालो आहोत. तो रंग आला कोठुन? परमात्मा जो समोर उभा आहे त्याच्यापासून. चन्द्रमा जसे चांदणे पसरवितो, अमृताची वर्षा करतो तसाच तो परमात्मा अमृताप्रमाणेच शान्ति, आनन्द, प्रेम यांचा वर्षाव करीत आहे. आपण त्यात डुंबत

आहोत. चन्द्रम्यापासून अमृत पाझरते तसे आकाशात उभ्या असलेल्या परमेश्वरापासून प्रेम, आनन्द यांची वृष्टीं होत आहे. ज्याप्रमाणे सागरात बर्फास बुडवावे, त्याप्रमाणेच आपणही परमेश्वरात डुबकी मारीत आहोत. असे डुंबत आहोत की जसे रंगाच्या हौदात कपडे बुडवावे. सर्वत्र रंगच रंग होऊन जाऊ दे. चेतनतारूपी जलांत मिसळलेल्या रंगात असे रंगून गेलो आहोत की बस त्याच्याशिवाय दुसरे काही नाहीच. तन्मय होऊन आनन्दरूप होत आहोत. येथून जाऊ तेव्हा इष्टरूप आपल्या बरोबर येत असेल. त्याच्या दर्शन, भाषण, स्पर्श यात उत्तरोत्तर आपण इतके मुग्ध होत आहोत की आपल्याला स्वत:चाही विसर पडला आहे. त्या परमात्म्याशिवाय दुसरी कुठली गोष्ट दिसतही नाही आणि अनुभवासही येत नाही. सियावर रामचन्द्रकी जय.

शान्ति: ! शान्ति: !! शान्ति: !!!



# भगवान कसे वश होतील?

कुणाला वश करून घ्यायचे असेल तर त्यांची सेवा करा, गुणांचे वर्णन करा गुणगान करा, आज्ञापालन करा. सेवेने महात्मा लोक वश होतात, ब्रह्मा, विष्णु, महेश सर्व प्रसन्न होतात. कुणाला वश करून घ्यायचे असेल तर ही विद्या सर्वांत श्रेष्ठ आहे. मग भगवंतालाच का वश करून घेऊ नये की ज्यायोगे सर्वच वश होतात. भगवान सांगतात जो माझी भक्ती करतो तो जर मला विकेल तर मी विकला जाण्यास तयार आहे—

**बेचे तो बिक जाऊँ नरसी म्हारो सिर धणी।**

संसारातील सर्व पदार्थ धनाने मिळतात पण भगवान धनाने मिळत नाहीत. आपण जर आपल्या स्वत:ला भगवत्‌चरणी अर्पण केले तर भगवंताचा नियम आहे. की ते त्या भक्ताला वश होतात. भगवंताला जर विकत घ्यावयाचे असेल तर सर्वात श्रेष्ठ विद्या ही आहे—खरे बोलणे, दुसऱ्याच्या स्त्रीला मातेसमान मानणे आणि भगवंताच्या अधीन राहाणे.

**सत्य बचन आधीनता परतिय मात समान।**
**इतनेमें हरि ना मिलें तुलसीदास जमान॥**

एकच गोष्ट अशी आहे की जी धारण करण्याने बाकी सर्व आपल्या आपण येते. राजाला बोलावले की सर्व सेना येते. त्याप्रमाणे भगवंताच्या भक्तीने सर्व गुण आणि दैवी सम्पदा आपोआप येतात. ती व्यक्ती सद्‌गुण सदाचाराची मूर्ती बनून जाते. जर आपल्याला ही गोष्ट जमली तर ठीक आहे. नाहीतर भगवंताची सतत आठवण ठेवावी. जडात भगवान आहेत.

---

प्रवचन—दिनांक १२-४-१९४६, प्रात:काल ५ बजे, वटवृक्ष, स्वर्गाश्रम।

**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्।**
**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित्॥**

(गीता १५। १)

आदिपुरुष परमेश्वररूप मूळ असलेल्या आणि ब्रह्मारूप मनुष्य शाखा असणाऱ्या ज्या संसाररूपी वृक्षास अविनाशी म्हटले जाते, तसेच वेदांना ज्याची पाने म्हटलेले आहे-त्या संसाररूपी वृक्षाला जो पुरुष मूळासहित तत्त्वतः जाणतो, तो वेदांचे तात्पर्य जाणणारा आहे.

उद्दालक ऋषिच्या पुत्राचे नाव श्वेतकेतु होते. वेद-वेदान्त आदि शिकून आल्यावर त्याने म्हटले की मी विद्वान आहे. अहंकार आला होता आणि पित्याला मूर्ख समजून नमस्कारही केला नाही. वास्तविक जो आपल्याला पण्डित समजतो तो मूर्ख आहे. पित्याने म्हटले की मुला! ती विद्या शिकलास की नाही की जी एक गोष्ट जाणली असता सर्व गोष्टींचे ज्ञान होते! मुलाने सांगितले की ही तर विद्या शिकलो नाही. पिता म्हणाला-एक परमात्म्याचे ज्ञान झाल्याने सर्वांचे ज्ञान होऊन जाईल. त्याने पहिल्यानेच विचार केला होता की ते ज्ञान झाले असते तर अहंकार आला नसता.

मुलाने शंभर वर्षे जरी माता-पित्यांची सेवा केली तरीही तो त्यांच्या ऋणातून मुक्त होऊ शकत नाही, वाटल्यास आजीवन सेवा करो.

**यन्मातापितरौ क्लेशं सहेते सम्भवे नृणाम्।**
**न तस्य निष्कृतिः शक्या कर्तुं वर्षशतैरपि॥**

एकाच्या ज्ञानाने सर्वांचे ज्ञान कसे होते? जसे सोन्याचे ज्ञान ज्याला झाले त्याला सोन्याचे अलंकार सोनेच दिसू लागतात. लोखंडाचे ज्ञान झाल्यावर सर्व अस्त्रे-शस्त्रे लोखंडच दिसू लागतात. मातीचे ज्ञान झाल्यावर सर्व मृत्तिकापात्रे मातीच्या रूपातच दिसू लागतात. भगवान गीतेत म्हणतात-

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः॥**

(गीता ७। १९)

अनेक जन्मानंतरच्या शेवटच्या जन्मात तत्त्वज्ञानास प्राप्त झालेला पुरुष, सर्व काही वासुदेवच आहे या प्रकारे मला भजतो, असा महात्मा अत्यन्त दुर्लभ आहे.

परमात्म्याच्या ज्ञानाने सर्व ब्रह्माण्डाचे ज्ञान होते. आपण तर असे समजावे की जो काळ गेला तो गेला आता उरलेले आयुष्य तरी हरीकडे लावावे. आता तर हा निश्चय करा की जे काही बरेवाईट झाले ते होऊन गेले आता आयुष्याचा उरलेला काळ, चालताना, उठताना, बसताना, खाताना हरघडी परमात्म्याचे स्मरण केले पाहिजे. आपण आपल्याला भगवंताकडे लावून द्यावे.

**'मैं आशिक तेरे रूपपर बिन मिले सबर नहीं होती।'** हा भाव धारण केला असता भगवंतास बाध्य होऊन यावेच लागेल. भगवान प्रेमानेच भेटतात प्राप्त होतात.

**हरि ब्यापक सर्बत्र समाना। प्रेम तें प्रगट होहिं मैं जाना॥**

हरि सर्वांच्या पापांचे हरण करणारे, पाप्यांतील पाप्याला पवित्र बनविणारे, पवित्रामध्येही पवित्र, मंगलांत ही मंगल असे आहेत. भगवान सर्वत्र विराजमान आहेत. काडेपेटीच्या घर्षणाने जशी आग उत्पन्न होते त्या प्रमाणे प्रेमाच्या घर्षणाने परमात्म्याची प्राप्ती होते. आपण आपल्याला धूळीत मिळवून टाका, भगवंतावर खूप प्रेम करा. अथवा अशी इच्छा करा की आमच्या शरीराची धूळ होऊन जावी आणि त्यावर भगवंतानी शयन करावे म्हणजे आमचा जन्म सफल होऊन जाईल. आपण स्वत: आपल्याला भगवंतास समर्पण करा. पंचा असतो त्याचा मालक त्याचा स्वत:स हवा तसा उपयोग करतो, त्यात पंचाचा काही स्वार्थ नसतो त्याप्रमाणेच आपण आपल्याला

परमात्म्यास अर्पण करून टाकावे. आजपर्यंतचा जो काळ गेला तो गेला पण बाकी उरलेला समय परमात्म्यामध्ये लावावा. प्रेमात पागल होऊन जावे. अशा वेडाची आवश्यकता आहे. लोक धनासाठी वेडे होतात पण तुम्ही भगवंतासाठी वेडे व्हा. सीता भगवंताच्या विरहात व्याकुळ होत होती, विलाप करीत होती, तर भगवानही सीतेच्या विरहाने व्याकुळ होऊन विलाप करीत होते. जरा विचार करा की भगवान काय व्याकुळ होऊ शकतात का ? पण जेव्हा सीता व्याकुळ होत आहे तेव्हांच भगवानही व्याकूळ होत होते. प्रेमामुळे व्याकुळ होत आहेत. भगवंतास पागल बनवायचे असेल तर तुम्ही प्रेमाने प्रथम पागल बनून जा.

संसारा सम्बन्धी वैराग्य आणि भगवंताविषयी प्रेम या दोनच गोष्टी आहेत. संसाररूपी वृक्षाला एकदम छाटून टाका आणि आपल्या स्वत:ला भगवंताच्या ठिकाणीं लावा. संसाररूपी दृढ मूळ असलेल्या वृक्षाला वैराग्यरूपी शस्त्राने छाटून टाका. आणि नंतर त्या परमरत्न परमात्म्याचा शोध घ्या. संसारास उत्पन्न करणारे आणि त्याचा विस्तार करणारे भगवानच आहेत. आपण शेकडो कोस अंतरावरून तीन महिन्यासाठी येथे येत असता. कित्येक महिने तीर्थयात्रा केल्या, खूप भटकलो, अशी जागा मिळाली नाही. भगवंतानी हे स्थान प्रथमपासूनच आम्हा लोकांसाठी तयार करून ठेवलेले होते. फक्त त्याच्या रक्षणासाठी चारी बाजूस दगड मांडून ठेवले होते. याची सेवा यालाच सर्वस्व जाणून एक तांब्याभर पाणी घालून करा. यज्ञ आणि तपाचे भोक्ता भगवान आहेत. जणु अग्निरूपाने भगवान त्या वस्तूचा स्वीकार करीत आहेत. देवतांची पूजा केली तर असे समजले पाहिजे की भगवानच देवतेच्या रूपाने पूजा करवून घेत आहेत. या प्रकारे सर्वांमध्ये असेच समजावे. या वटवृक्षासही या प्रकारेच समजावे.

नामदेवांच्या घरामध्ये आग लागली तेव्हा लोकानी सांगितले–

आपल्या घरात आग लागली आहे. तेव्हा ते पळत पळत आले आणि म्हणाले—'प्रभो ! आपण अर्ध्याचाच भोग घेतलात. उरलेल्या अर्ध्याचा का नाही उपभोग घेतला ? हे भगवान, याने काय अपराध केला आहे ? आपण खूप कृपा केली आहे, आपण अग्निरूपाने आमच्या घरी आला आहात. एक कुत्रा दोन भाकरी उचलून घेऊन पळू लागला तर त्याच्यामागे तुपाची वाटी घेऊन पळत सुटले. महाराज ! तिला तूप चोपडलेले नाही. ' कोरडी आहे जरा तूप तर लावून घ्या ! असे म्हणाले. भगवंतास प्रकट व्हावे लागले.

आपल्याकडे भगवान फार स्वस्त आहेत, एक लोटाभर पाण्याने प्राप्त होतात. पण असा भाव असला पाहिजे. समुद्रात ज्याप्रमाणे लहरी उठतात त्याप्रमाणे या स्थानावर वैराग्य उठते. वनामध्ये जाण्याने एकदम वैराग्य उत्पन्न होते. येथे तर तीन गोष्टी दिसून येत आहेत— गंगेचा किनारा, पहाड आणि वृक्ष. पण तेथे वनात तर वृक्षच वृक्ष दिसून येतात. आपल्या पहाडातील गुफा प्राकृतिक आहे. मेहनत-मजूरी करणारे अशी बनवू शकत नाहीत, गंगेने बनविली आहे. ईश्वराची आपल्यावर पूर्ण दया आहे, त्यानी सर्व सामान सजवून ठेवले आहे. आपल्याला तर येथे येऊन फक्त तंबू ठोकून राहावयाचे आहे, मुक्काम करावयाचा आहे. भगवंतास शरण जाणे हेच फक्त आपले काम आहे, दुसरे काही नाही. सर्व व्यवस्था भगवंतांनी केली आहे. गंगास्नान, जप, तप, जे पाहिजे ते करावे पण भगवत-भजन करा. गंगेच्या दर्शनाने पाप समाप्त होऊन जाते. येथे तर खाणे पिणे सर्वामध्ये गंगाच गंगा आहे. गंगेची वाळू जी मरण्याच्या समयी बीकानेर आदिमध्ये लाख रुपये देऊन मूठभरही मिळू शकत नाही, ती येथे सर्वत्र विखरून पडली आहे. गंगेला तर भगीरथानेच आणली होती. जो विशेष परिश्रम करतो, त्यासाठी असे म्हटले जाते की त्याचे परिश्रम भगीरथ परिश्रम आहेत. म्हणून भगीरथाला धन्यवाद

दिले पाहिजेत. कारण त्याच्या कृपेने आम्हा लोकाना गंगा सुलभ झाली आहे. तुलसीदास निघून गेले पण त्यांचे रामायण लाखो, करोडो मनुष्यांचा उद्धार करीत आहे. संसारा सम्बन्धी वैराग्य आणि भक्ति मध्ये प्रेम हीच एक गोष्ट सार आहे. सर्वत्र विखुरलेल्या प्रेमाला एकत्रित करून भगवंताच्या ठिकाणी लावावे. इतत्र असलेले प्रेम आहे त्याला तेथून हटवावे आणि परमात्म्या मध्ये लावावे. एकापासून तोडावे आणि दुसऱ्या एकाशी जोडावे.

भगवंताच्या ठिकाणी प्रेम लावून, संसारा सम्बन्धीची आसक्ती नष्ट करून वाटल्यास मनास सांगावे की तू आता वाटेल तेथे जा. पण जेथे प्रेम नसते तेथे जाणे होत नाही. मल–मूत्रामध्ये कोणी प्रेम करीत नाही. त्याप्रमाणेच संसाराचा त्याग करावा. संसाररूपी बगीच्यामध्ये राहावे पण त्याला स्पर्शही न करता राहावे. सर्व भोग मल–मूत्राप्रमाणे प्रतीत व्हावेत. ज्या प्रमाणे साधु बगीचात राहात असूनही फूले तोडत नाही अत्तर, गुलाब आदिंना गाढवाचे मूत्र समजावे. तसेच मेवा, मिष्टान्न आदिंना समजावे आणि असेच अन्य भोग्य पदार्थांना समजावे. वैराग्यामुळे उपरति होईल आणि उपरतिमुळे ईश्वराचे ध्यान होईल. वैराग्याने जे सुख मिळते त्याहून अधिक सुख परमात्म्याच्या ध्यानात आहे आणि ध्यानाहून अनन्तपट सुख भगवंताची भेट झाल्याने आहे. त्याच्याहून अधिक कुठलाही आनन्द नाही. या कलियुगात भगवंताजवळ जाण्यासाठी सरळ रस्ता आहे. जे काम वर्षांनी होत असे ते दिवसांत होत असते. ज्या पुरुषांच्या ठिकाणी श्रद्धा नाही त्यांच्यासाठी भगवान म्हणतात की चौऱ्याशी लाख योनिमध्येही मी त्यांना मिळू शकत नाही मला त्यांना भेटण्याची इच्छा नाही श्रद्धा ठेवा, भगवान आपोआप भेटतील, जर श्रद्धा नसेल तर श्रद्धेसाठी भगवंताची प्रार्थना करा.



# दयेचे रहस्य जाणण्यानेही मुक्ती

ईश्वराची दया आपण आपल्यावर जितकी आहे असे समजू तितकी त्याची दया आमच्यावर आहे. ज्या प्रमाणे गंगेची दया सर्वांवर समान आहे पण ज्याचे पात्र जितके मोठे असेल तो तितकेच पाणी भरून घेऊ शकेल. गंगेत काहीही कमतरता येणार नाही. गंगेत तर काही कारणाने कमतरता ही येऊ शकते पण भगवंताच्या दयेला पार नाही. मर्यादा नाही म्हणूनच भगवंतासाठी सागराचे उदाहरण दिले जाते.

आपण समजू या की ईश्वराची आपल्यावर अपार दया आहे. आम्ही दयेसंबंधी जितके अनुमान केले आहे त्याहूनही अधिक भगवंताची दया आमच्यावर आहे. आपण तर नुसते असे म्हणतो पण वास्तविक मानत नाही. जर मानत असतो तर हरघडी आपण मुग्ध झालो असतो आपल्याविषई शोक, चिंता, भय काहीही राहिले नसते. एका साधारण राजाच्या राज्यात राहणारी व्यक्ती राजाच्या दयेमुळे निश्चिन्त, निर्भय होऊन जाते. परमेश्वराच्या शक्ती सम्बन्धी आपण जितके अनुमान करू त्याहूनही ती फार महान आहे. सर्व जगांतील मनुष्यांनी जरी त्याच्या शक्तिसम्बन्धी अनुमान केले तरी तेही अल्पच ठरेल. लोक म्हणतातही की ईश्वराची आमच्यावर दया आहे पण मानत नाहीत.

यांत समजून घेण्याची एक महत्त्वाची गोष्ट आहे. अर्जुनाकडे पहा, तो तर भगवंताचा प्रभाव जाणत होता, परन्तु त्याच्यामध्येही उणीव होती. तो पूर्ण प्रभाव जाणत नव्हता.त्याने म्हटले आहे—

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि॥**

(गीता ११।४१)

आपल्या या प्रभावाला न जाणून, आपण माझे मित्र (सखा) आहात असे मानून मी प्रेमाने अथवा प्रमादाने 'हे कृष्ण!' 'हे यादव!' 'हे सखे!' या प्रकारे विचार न करता-समजून न घेता हट्टाने तुला म्हटले आहे.

असे व्हावयास नको होते. अर्जुन दहाव्या अध्यायात म्हणतो आहे—'**परं ब्रह्म परं धाम**' यानंतर भगवंतांनी आपल्या विभूती सांगितल्या. भगवंतानी सर्व गोष्टी सांगितल्या, आपला प्रभावही सांगितला. अर्जुनाने स्वीकारही केला, आणि तरीही म्हणाला—

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम्॥**

(गीता ११। ४)

हे प्रभो! जर माझ्याकडून आपले ते रूप पाहिले जाणे शक्य आहे असे आपण मानत असाल तर हे योगेश्वरा! त्या अविनाशी स्वरूपाचे मला दर्शन घडवा.

अर्जुनाला भगवंताचे स्वरूप पहाण्याची इच्छा तर होती पण काही कमतरताही होती. भगवंताच्या वचनांवरून कळून येते की अर्जुनात थोडी कमतरता होती. यावरून हे सिद्ध होते की अठराव्या अध्यायातच त्याचा मोह नष्ट झाला. जोपर्यंत भय असते तोपर्यंत मोह आहे हेच कळून येते. भयाचा नाश झाल्यावर त्याचा मोह नष्ट झाला, त्याच्यानंतरही अर्जुनाचा मोह नष्ट झाला की नाही ही शंका शिल्लक राहते कां? तर तशी गोष्ट नाही कारण भगवंतानी उपदेश करणे बंद केले आहे.

म्हणतो आहे की आपण जे सांगाल ते करीन पण आपल्याच गोष्टीला मान्यता देतो, म्हणजे मी ही गोष्ट मानणार नाही.

आपल्या सर्वांची अशीच अवस्था आहे नाही का? दुसरी गोष्ट ही आली आहे की भगवंताचे तत्त्व-रहस्य-प्रभाव जाणल्याने मनाने पूर्ण त्या भगवंतास शरण जाणे घडते. शरण जाण्याने मनुष्य पूर्ण दयेस पात्र ठरतो. पूर्ण दयेला पात्र होण्याने परमात्म्याची प्राप्ती होऊन जाते. यातील हेतु-गुण रहस्य आणि प्रभाव आहे.

स्वाभाविक श्रद्धेचा कधी नाश होत नाही. श्रद्धा उत्पन्न होते आणि परत नाहीशी होते. एखाद्या महात्म्याच्या ठिकाणी त्यांचे गुण पाहून आपली श्रद्धा बसते, गुण कमी आहेत असे दिसून आले तर श्रद्धा कमी होते. पण ईश्वराच्या बाबतीत अशी शंका येण्याचे कारणच नाही.

आम्हा लोकांचे ईश्वराच्या ठिकाणी हेतु रहित प्रेम जर होईल तर त्याच वेळी परमात्म्याची प्राप्ती होऊन जाईल. जसे प्रल्हादाचे भगवंतावर प्रेम होते. म्हणजे हेतुरहित प्रेम अमूल्य आहे, समजा त्याचे मूल्य सांगायचे ठरवले तर परमेश्वर हेच त्याचे मूल्य आहे. परमेश्वर प्रेमानेच प्राप्त होतो. ज्याप्रमाणे भाजीपाला पैशाने मिळतो त्या प्रमाणे परमेश्वरही प्रेमाने मिळतो. शास्त्रात ब्राह्मणाचे मूल्य गाय असे सांगितले आहे. त्याच प्रमाणे भगवंताचे मूल्य भगवंतावरील प्रेम सांगितले गेले आहे. प्रेम अशी वस्तू आहे की ती त्याच्या बदली वाटेल ती वस्तू खरेदी करावी.

शरणागतीचे एक रहस्य आहे आणि दयेचेही एक रहस्य आहे. दयेचे रहस्य आपण जाणत नाही म्हणून पूर्ण लाभ आपण घेऊ शकत नाही. ज्या प्रमाणे एखाद्याच्या घरी परीस पडलेला असतो पण तो त्या परीसाचा प्रभाव जाणत नसतो. त्या परीसा प्रमाणे आपल्यावर ईश्वराची दया आहे. परीसाचा प्रभाव जाणला की

दारिद्र्याचा नाश होतो. त्याप्रमाणे परमेश्वराच्या दयेला आपण जाणू शकलो तर त्या क्षणी आपल्या सर्व पापांचा, अवगुणांचा नाश होऊन जाईल.

ईश्वराची भक्ती करण्याने मुक्ती मिळते आणि ईश्वराचे तत्त्व दयेचे रहस्य जाणण्यानेही मुक्ती मिळते.

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति॥**

(गीता ५।२९)

माझा भक्त मला सर्व यज्ञ आणि तपांचा भोक्ता, सम्पूर्ण लोकांच्या ईश्वराचाही ईश्वर तसेच सम्पूर्ण भूतांचा–प्राणिमात्रांचा सुहृद अर्थात स्वार्थरहित दयाळू आणि प्रेमी असे तत्त्वतः जाणून शान्तिला प्राप्त होतो.

भगवंतांनी घोषणा केली आहे की ही गोष्ट जाणल्याने मनुष्य शान्तिला प्राप्त होतो. मग यात आणखी काय बरे सांगावे? साधारण राजाला सुहृद जाणल्याने सुद्धा मनुष्याचे दुःख नष्ट होत असते.

ईश्वरांनी त्यांच्याकडून अधिकार बहाल केला आहे, आपण तर अनाथ होतो, आपली चौकशी करणारेही कोणी नव्हते. ईश्वरांनी मनुष्याचे शरीर दिले ही असीम दया केली आणि सर्व अधिकारही देऊन टाकले आहेत. याचा उपयोग करणे न करणे ही मनुष्याच्या अधिकारातील गोष्ट आहे. जो या प्रकारे ईश्वराची दया मानतो तो हरघडी प्रसन्न राहात असतो.

ईश्वराची दया अपार आहे. त्यातील रहस्य आम्ही समजू शकत नाही. दयेचे रहस्य म्हणजेच ईश्वराच्या दयेला जाणण्यानेच मनुष्य मुक्त होऊन जातो. ज्या प्रमाणे एक राजा अत्यंत दयाळू आहे. त्याने असा कायदाच केला आहे की माझ्याजवळ

जो कुणी काही मागण्यास येईल त्याला तीच वस्तू दिली जाईल. पण एक गोष्ट आणखी आहे की जर मागणाराने त्याचे नुकसान होईल अशी वस्तु मागितली तर ती मात्र दिली जाणार नाही. बाकी सर्व वस्तु तो देईल. एक गरीब मनुष्य दुःखी आहे, रडतो आहे, ज्यावेळी त्याला त्या राजाच्या दयेचे रहस्य कळाले त्यावेळी तो सुखी होऊन गेला. या प्रकारे आम्हीही जर ईश्वराचा प्रभाव, त्याची दया जाणून घेतली तर आमचे क्लेश नष्ट होऊन जातील.



# मनाने परमात्म्याचे चिंतन करीत राहावे

आत्मकल्याणाची इच्छा करणाराने सर्वांत प्रथम आपले मनाची सुधारणा करणे आवश्यक आहे. जर आपल्याला मनाची सुधारणा होण्याची आवश्यकता लक्षात येत असेल तर या क्षणी त्या प्रयत्नास लागले पाहिजे. एकच गोष्ट आहे या मनाची देख-भाल करा की मन काय करीत आहे. हरघडी गुराख्याप्रमाणे हातात काठी घेऊन तयार राहा. ज्याची वृत्ती चांगली असेल तो गुराखी हातात काठी घेऊन सतत गायीच्या मागे राहातो. म्हणजे तिने दुसऱ्याच्या शेतात घुसू नये नाही तर गायीलाही काठीचा मार बसेल आणि आपलाही अपमान होईल. हा संसार हे दुसऱ्याचे शेत आहे. भगवंताचे स्वरूप हे आपले शेत आहे. परमात्म्याच्या स्वरूपाचे चिंतन हेच आपल्या शेतात चरणे आहे. या एकाच गोष्टीत कल्याण आहे. पाच-सात गोष्टी करण्याची आवश्यकता नाही.

मन हे भोळ्या बालकासारखे आहे. जसे सहा महिन्याचे मूल चपळही असते आणि मूर्खही असते. अशा बालकाची आई त्याच्यावर सतत लक्ष्य ठेवून असते. आई घरांतील कामेही करतच असते परन्तु तिचे लक्ष्य त्या-बाळावर असते. मूल विंचू पकडण्यासाठी धावते परंतु आईचे लक्ष्य असल्यामुळे, ती भाकरी करता करता धावत येते. मूल शेगडीकडे जाऊ लागते तर त्याला उचलून घेऊन येते. परत तिकडे जाऊ लागले तर विस्तव विझवून शेगडी उंचावर ठेवून देते. मूल अजाणतेपणाने तरीही परत तिकडेच जाते, कोळसा खाऊ लागते, तेव्हा आईला राग येतो आणि ती दोन-चार थपडा ठेवून देते. या प्रकारेच मनाचे सरंक्षण करण्याची-त्याच्यावर नजर ठेवण्याची आवश्यकता आहे.

---

प्रवचन—दिनांक १२-४-१९४६, सोमवार, गोरखपुर।

**प्रश्न**—मनाला थप्पड कशी मारणार? बुद्धि मनाकडे लक्ष्य देईल त्याचे ध्यान करील की परमात्म्याचे?

**उत्तर—यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम्।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्॥**

(गीता ६।२६)

मन जेथे-जेथे जाईल तेथून-तेथून त्याला आणून परमात्म्याच्या ठिकाणीच वारंवार लावावे. परमात्म्याचे स्वरूप हे नियत स्थान आहे. बालक मन आहे, आत्मा आई आहे. बुद्धिद्वारा मनाला आईरूपी आत्म्याकडे आणून परमात्म्याच्या स्थानाकडे लावावे स्वरूपाकडे लावावे.

संसारातील विषयभोग हे आग-विस्तव आहेत. बालकरूपी मन त्यांच्याकडे जाते. आई हाक मारून सांगत असते तिकडे, जाऊ नको. ते ऐकत नाही. विस्तव अथवा शेगडी उंचावर ठेवणे म्हणजे विषयांना नियंत्रित करणे-नियमबद्ध करणे आहे. तरी मन फिरून तिकडेच जाते, ते नियम तोडण्याची इच्छा करते.

आग विझवून टाकणे म्हणजे विषय भोगांचा एकदम त्याग करणे आहे. ज्या प्रमाणे एखाद्या गृहस्थाने संन्यासाश्रमात प्रवेश केला म्हणजे विषयांचा स्वरूपाने त्याग केला. तरी मन त्या बालका प्रमाणे कोळशाकडे जात असते. विषयांचा स्वरूपाने तर उपभोग घेत नाही पण मनाने विषयांचे चिंतन करीत राहाते.

अन्नापासूनच मन बनते, अन्न न देणे, म्हणजे उपवास करणे हेच मनालाथप्पड मारणे आहे. ज्यावेळी दुसऱ्याच्या स्त्रीकडे मन जाईल तर नित्य उपवास करा. नित्य थप्पड खाता-खाता त्याला विचार सुचेल की आई का मारीत आहे? नंतर ते थांबेल-विषयाकडे जाणार नाही. खोटे बोलणे, क्रोध करणे सर्वांसाठी उपवास करणे हाच संयम आहे. साधनाची वाढ होणे हे मुलाचे मोठे होणे आहे. त्याला नंतर समजावून सांगितले पाहिजे.

मातेची मुख्य वृत्ति बालकाच्या ठिकाणी असते, गौण वृत्तीने ती स्वयंपाक करीत असते. रोजच्या रोज थप्पड मारू नये, नाही तर त्याला ती संवयच लागेल. समजाविण्याचाच प्रयत्न करीत राहावे.

दोरीवर कसरत करणाऱ्या कलावंताचे उदाहरण पाहिले पाहिजे. मनाचा संयम राखण्याचे काम ही मुख्य वृत्ति असली पाहिजे. गौणीवृत्तीने सांसारिक कामे केली पाहिजेत. बांबूवर तो कलावंत चढतो तेव्हां गळ्यात ढोलके, डोक्यावर घडा, हातात ढोलके वाजविण्याची दांडी असते आणि पाय दोरीवर असतात.

मन हे रेशमाच्या लडीसारखे आहे. त्यात खूप गुंतागुंत झाली आहे. हलक्या हाताने सावकाश सावकाश ती सोडवीत राहावे. जोपर्यत गुंतागुंत सुटत नाही तोपर्यंत प्रयत्न करण्याचे सोडू नये. घाई अजिबात करूं नये परंतु प्रयत्न केल्याशिवायही राहू नये.



# संन्यास्याचे जीवन

भजन, ध्यान यांनी पाप नष्ट होऊ शकते परन्तु ऋण मात्र फिटू शकत नाही. पापनाशाचे अनेक उपाय आहेत. जप, ध्यान, तप, जितक्या प्रकारची निष्काम कर्मे आहेत, निष्काम उपासना आहे, त्या सर्वांनी पापांचा नाश होतो. ऋणाचे काम मात्र साधे नाही शास्त्र तर येथपर्यन्त सांगते की दान घेऊन ऋण फेडावे चुकते करावे. पापापेक्षाही ऋण दोषदृष्टीने मोठे आहे. पाप करणारा नरकात जाऊ शकतो पण ऋण घेणाराला तर ऋण फेडावेच लागते. जेथे दान आणि ऋण दोन्ही एकत्रित होतात तेथे तर अधिकच कठीणता आहे. राजा नृगाने एकच गाय दोन वेळा दान दिली. दोन्ही ब्राह्मणांना समजाविले पण त्यांनी ऐकले नाही. त्या कारणाने राजाला सरडा बनून राहावे लागले. चूक झाली होती पण सुटका झाली नाही म्हणून पुढे लोकांनी अशी चूक करू नये.

सर्व गोष्टींचा अनुभव घेऊन पाहिला आहे आणि त्यावरून कुठल्या गोष्टी सांगितल्याने लाभ आहे आणि कुठल्या सांगितल्याने नुकसान आहे याचा अंदाज आला आहे. मी भुक्तभोगी आहे. सर्व प्रकारची चाल चालून पाहिली आहे. अनेक प्रकारे अनुभव घेतला आहे की कोणाशी कशा प्रकारचा व्यवहार केला पाहिजे. कुणाचीही जशी चिठ्ठी येईल त्याप्रकारे त्याला उत्तर द्यावे. एका माणसाने विचारले ब्रह्मचर्याचे पालन करीन, तर त्याला उत्तर लिहिले, विवाह करून घे.

दोन मार्ग आहेत. स्वार्थ, आसक्ती, ममता यांचा त्याग करून कर्म करणे हा एक आणि स्वार्थ, आसक्ती तसेच ममता यांचा

त्याग करून स्वरूपाने कर्मांचा त्याग करणे हा दुसरा. दोन्ही प्रकारे मुक्ती मिळते.

**ज्ञेयः स नित्यसन्न्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति।**
**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते॥**

(गीता ५।३)

हे अर्जुना! जो पुरुष कुणाचाही द्वेष करीत नाही आणि कशाची आकांक्षाही करीत नाही तो कर्मयोगी सदा संन्यासीच समजण्यास योग्य आहे कारण राग-द्वेषादि द्वन्द्वांपासून रहित पुरुष सुखपूर्वक संसारबन्धनांतून मुक्त होऊन जातो. द्वन्द्व रहित होऊन तुम्ही कुठे ही राहा, अंतरांतील त्यागच मुक्ती देणारा आहे.

संन्यास्याने हर घडी चित्तवृत्तींचा संयम राखावा. दृष्टी खाली ठेवावी. कुणाबरोबर कसलाही सम्बन्ध ठेवू नये या प्रकारे अलिप्तता ठेवावी. हर घडी वैराग्याची-दोरी खेचून धरावी. ज्याप्रमाणे वर्तमानकाळात मांसासम्बन्धी वैराग्य आहे तसेच पुढे भोगांचे लेश मात्र शिल्लक राहू देऊ नये. बसलेले आहात, सत्संगाच्या गोष्टी चालू आहेत. मध्येच कोणी (अडंग-बडंग)इकडच्या तिकडच्या फालतू गोष्टी बोलू लागले, युद्धासम्बन्धी, विवाहाची चर्चा अथवा सांसारिक गोष्टी संबंधी विचारू लागले तर बस, उत्तरच देऊ नये, मौन राहावे. एक तर तो समजून जाईल नाहीतर नारायण! नारायण! म्हणून उठून चालू लागावे. मैल दोन मैल निघून जावे. गर्दी ओसरली दोन चार माणसे पाठोपाठ आली तर मग जरा बसावे. सत्संग चालू असेल तर ठीक नाही तर चांगली अगर वाईट दुसऱ्याची चर्चा ऐकूच नये. वस्त्रांचा संग्रहही संन्यास्याने करू नये. एक अधोवस्त्र आणि एक उत्तरीय वस्त्र पर्याप्त आहे, पांघरावे, ते पसरावे, अंथरावे. कुणाच्याही घरी जाऊन भोजन करण्यास संमति देऊच नये. कोठून आले तर त्याच भीक्षेचा स्वीकार करावा. एकेक तुकडा इथे तिथे मिळाला, बस पोट

भरून गेले. प्रथमपासून काही स्वीकारूच नये. शुद्धतेची आवश्यकता नाही. भोजन निर्मळ असावे. कोठे अपवित्र अखाद्य मिळाले तर त्याचा त्याग करावा. अन्न जल जेथे मिळेल, ज्या रूपात मिळेल, एक पात्र अथवा कमण्डलू फक्त जवळ बाळगावा. आणि एखादे गीतेचे पुस्तक जवळ बाळगावे. सतत मौन राहावे. भजन, ध्यान करीत राहावे. थंडी लागली तर सहन (तितिक्षा) करावी. ह्या श्लोकाचा पाठ करावा—

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत॥**

(गीता २।१४)

हे कुन्तीपुत्रा! थंडी-गरमी आणि सुख-दुःखाला देणारे इन्द्रिय आणि विषयांचे संयोग तर उत्पत्ति, विनाशशील आणि अनित्य आहेत. म्हणून हे भारता! तू त्यांना सहनकर.

एक भगवद विषयक चर्चेशिवाय इतर चर्चा करूच नये. ज्या स्थानाचा कोणी स्वामी (मालक) नसेल तेथे राहावे. कुठल्याही गोष्टीवर कुणाचा अधिकार असेल तर ती गोष्टी वापरू नये-उपयोगात आणू नये. कुठे कुटी अथवा झोपडी बनवू नये. मनात कुटी बनविण्याची इच्छा झाली तर स्मशानात निघून जावे. संन्यास्यासाठी ते स्थान सर्वाधिक पवित्र आहे. स्मशानातच वास करावा. प्रेत जाळण्यासाठी आले तर त्यावेळेपुरते जंगलात निघून जावे. कुठे झोपडी असेल की जिचा कोणी स्वामी (मालक) नाही तर तिच्यामध्ये राहावे.

संन्यासाने कसे वागावे हा प्रश्नच उठता कामानये. जे काही करीत असेल, त्यातील कार्यकारण भाव नाहींसा व्हावा. केवळ शरीर-निर्वाह, भजन, ध्यान, उपरामता, वैराग्य आणि थोडा सत्संग करावा. वेळेचे बन्धन सुटून जावे. ते तर गृहस्थासाठी

आहे. संस्था, मठ, कमिटी इत्यादिचे काहीही काम नाही, तो स्वतःच जीता-जागता नियम आहे. त्यास अनुसरून जो राहू शकेल त्याने त्याच्या जवळ राहावे. पाच माणसे बरोबर आली तर त्याना सांगण्याची सुद्धा आवश्यकता नाही. ती झोपलेली असतील तेव्हा त्यांना सोडून तेथून निघून जावे. त्यांनी शोधले तरी त्यांना पत्ता लागू नये. कधी परत भेटली आणि त्यांनी विचारले तर स्पष्ट काय ते सांगून टाकावे.

**प्रश्न**—संन्यास घेतल्यानंतरच्या स्थितिमध्ये लेख वगैरे लिहिणे होऊ शकते कां ?

**उत्तर**—काहीही नाही, गृहस्थाश्रमाबरोबरच लेख वगैरे लिहिणे सर्व गेले. सेवेचे, उपकाराचे जे काही काम आहे ते बुडीत खात्यात गेले. त्यामुळे नियमित रूपाने सत्संग होत नाही. तेथे तर हरघडी सतत सत्संगच आहे. कोणी जवळ आला तर तास दोन तास सांगावे. कुणी ऐको अगर वाटल्यास न ऐको.

अमुक साधु आले, अमुक महात्मा आले मनाला वाटेल तर बसावे. आपली तसेच-दुसऱ्याची मान-प्रतिष्ठा सर्व सोडून द्यावी मग वाटल्यास सीतामऊ महाराज येवोत वाटल्यास बीकानेर महाराज येवोत, काही मतलब नाही.

अशांच्या बरोबर ज्याने प्रथमच शरीराला बुडित खात्यात लिहिले असेल तोच राहू शकतो. कारण शरीर कुठे (केव्हा) पडेल याचा पत्ता नाही. (ते माहीत नाही) कुणाचीही पर्वा नाही. आत्ता जरी करपात्रीजी महाराज आले तर तेही लाम्बलचक हात जोडतात, मग तोंडाने काही बोलण्याचीही आवश्यकता नाही. शुकदेवजी, ऋषभदेवजी यांची उदाहरणे पहावी.

कुणाचा तिरस्कार नाही, कुणाचा मान नाही, आपला स्वतःचाही मान नाही. कुणी काही वस्तू आणून ठेवली तर उठून

चालू लागावे कुणाशी सम्बन्धच ठेवू नये. कुठल्या नियमात बांधून घेऊ नये, सर्व नियम तोडून टाकावे. जे काही आपल्याकडून घडेल ते घडेल. उद्याचा कार्यक्रम आज बनवू नये.

सत्संगाचाही काही निश्चित समय ठरवू नये. जसे काही घडेल तोच विधि आहे. कोणी जर म्हटले की तुम्ही विरुद्ध करीत आहात तर उत्तरच देऊ नये.

## आपल्या पिताजींची गोष्ट

विक्रम संवत १९७२ (सन १९१५) ची गोष्ट आहे. वडीलानी विचारले की दुखणे बरे होईल की नाही. मी सांगितले की माहीत नाही. वडील म्हणाले की तुला माहीत तर आहे पण तू सांगत नाहीस. तू हनुमान गोयन्दकाला जी गोष्ट सांगितली होतीस, ती तशीच झाली. मी दुसरे काही जाणू इच्छित नाही, केवळ दुखणे बरे होईल की नाही हेच जाणू इच्छितो. त्यानी या प्रकारे करुणभावाने विचारल्यावर मला प्रेरणा झाली की हे दुःखणे बरे होईल.मी त्यांना तसे सांगितले आणि दुःखणे जाऊन त्यांना बरे वाटले. त्यानंतर जवळ जवळ बारा महिन्यानंतर वडील बद्रीनारायणला गेले तेथे मंदाग्नी झाला. तेव्हा परत हीच गोष्ट विचारली की दुःखणे जाईल की नाही? तेव्हा मी म्हटले की मला तर पत्ताही नाही आणि असे विचारताही कामा नये. तेव्हा त्यांनी माझ्या आईला सांगितले की तू विचार. आईने विचारले तेव्हा मी सांगितले की हे जाणण्यात हित नाही कारण जी सेवा आता ती करीत आहे नंतर ती तशी करू शकणार नाही. वडिलांनाही सांगितले की आपण विचारीत आहात तर मला फार संकोच वाटत आहे. यात काहीही लाभ नाही. नंतर सेवा कमी होऊन जाईल.वडील म्हणाले की मी हेच जाणू इच्छितो की हे शरीर राहाणार नसेल तर साधन अधिक तीव्र

करीन. मी म्हटले की साधन तर तीव्र केलेच पाहिजे. त्यांनी परत विचारले की मी 'हरे राम' मन्त्राचा जप करू इच्छितो. माझा विश्वास आहे की तू सांगितलेस तर मी वर्ष-दोन वर्ष जिवंत राहू शकतो. मी म्हटले की अशा गोष्टी करता कामा नयेत. मी जाणतो की मी जर अशी गोष्ट सांगितली तर माझी गोष्ट खोटी ठरेल. औषधोपचाराचा खूप प्रयत्न केला पाहिजे. प्रयत्न तर असाच करावयास हवा की ज्या योगे दुःखणे बरे होईल. ही गोष्ट मी आईच्या आग्रहावरून सांगितली होती. वडिलांनी म्हटले की माझी इच्छा केवळ भजन. व्हावे म्हणून होती. आता कुठल्याही प्रकारे तसे होऊ शकत नसेल तर माझा मृत्यु तुझ्या उपस्थितीत झाला पाहिजे. एका रात्रीची गोष्ट आहे मी त्यांना म्हटले की झोपा आता. त्यांनी म्हटले की समजा मृत्यु झाला तर? बरेच सांगितल्यावर. माझ्यावर भार ठेवून झोपले. मी जागत राहिलो नंतर आईला प्रात:काळी समजाविले. त्यांना जागे केले आणि म्हटले की आपण माझ्या सांगण्यावरून झोपला होतात, आता लवकरच आपला मृत्यु होईल. मी तुम्ही झोपेपर्यंत जबाबदारी घेतली होती, आता तुम्हाला सावध करीत आहे. भगवंताचे स्मरण करा.

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम्॥**

(गीता ८। १३)

जो पुरुष 'ॐ' या एकाक्षररूपी ब्रह्माचे उच्चारण करीत आणि त्याच्या अर्थस्वरूप माझे-निर्गुणब्रह्माचे चिन्तन करीत असता शरीराचा त्याग करतो, तो पुरुष परमगतिला प्राप्त होतो.

त्यांना या श्लोकाचा अभ्यास सांगितला आणि म्हटले की या अर्थाचे ध्यान करा. त्यांनी हा श्लोक म्हटला, स्पष्ट उच्चारण झाले नाही.

मी त्यांना सांगितले की सावधान राहिले पाहिजे. दोन दिवसापूर्वी त्यांना विचारल्यावरून त्यांनी सांगितले होते की मला तर आनन्दच आनन्द आहे. अन्त समयी बोलण्याची शक्ती फारशी राहिलेली नव्हती. त्यांनी माझ्या मामांना सांगितले याला साधारण भाचा समजू नकोस. हा साक्षात भगवान असून उद्धार करण्यासाठी आला आहे. माझ्या आईला सांगितले की तू चिन्ता करू नको. कारण असा पुरुष जेव्हां जवळ आहे तर उद्धार होण्यात काय उणीव आहे. माझ्या आनन्दाला काही मर्यादा नाही, या अवस्थेत मी याच्या समोर जात आहे यामुळे मला प्रसन्नता आहे. दोन दिवसापूर्वी वाळूवर खाली उतरवून ठेवले होते नंतर परत पलंगावर झोपविले होते. ज्या दिवशी शरीर त्याग केला त्यावेळी परत खाली ठेवले होते कीर्तन करीत राहिले. मी वारंवार सावध करीत होतो की भगवंताची स्मृति होत आहे ना? तीन दिवसापूर्वी पासूनच अशी प्रसन्नता प्राप्त झाली होती की जणु ब्रह्माचीच प्राप्ति झाली आहे. त्यांनी सांगितले एक आनन्दच आनन्द दिसून राहिला आहे. दुसरी कुठली वस्तूच नाही. त्यांच्या दृष्टीने तीच परमात्मप्राप्ती होती. स्वभावसिद्ध आनन्द दिसत होता. मी कधी उपनिषद्, कधी गीता कधी नामकीर्तन ऐकवीत होतो. शरीराची सेवा आई करीत होती. मी काही सेवा करू इच्छित होतो पण ते करू देत नव्हते, इतकी श्रद्धा होती. पाणीही पाजू लागलो तर सांगत की तुझ्या आईला बोलावून आण. प्राण जाऊ लागला तर तुला माझ्याजवळ राहिले पाहिजे.



# उद्धाराचा सरळ उपाय—शरणागती

आपण ज्याप्रमाणे रुपयांचे तत्त्व-महत्त्व समजतो, त्या प्रमाणेच जर परमात्म तत्त्वास जाणून घेतले तर बेडा पार होईल. आम्हा लोकानां तर रात्रं-दिवस तो संसारच सारखा दिसत राहातो. प्रकट राहात असतो. आपल्या जवळ जे काही असेल त्या सर्वांचा उपयोग परमात्म्याच्या कामात केला तर तो विश्वजित यज्ञच होत असतो. तो अत्यन्त मूल्यवान यज्ञ आहे. आपण खरे तर विश्वजित यज्ञ करावयास पाहिजे परन्तु आपल्या कडून कुटुम्बजित यज्ञही धड होऊ शकत नाही. प्राय: सर्व बंधुवर्ग असा विचार करीत असतो की रुपये कसे मिळतील, रुपये कसे मिळतील ? ज्याप्रमाणे लोभी माणूस रुपयांचे भजन करीत असतो त्या प्रकारे भगवंतासाठी भजन करावयास पाहिजे. किती मूर्खपणाची गोष्ट आहे की रुपयांच्या इतका दर्जाही आपण भगवंतास देत नाही. संसारात एक भगवंतास सोडून रुपयांमुळे घर, स्त्री, मुलगा मुलगी ज्याची म्हणून इच्छा असेल ते सर्व मिळू शकते. एक भगवान मात्र रुपयांनी मिळत नाहीत. तसेच भगवंताचे भक्तही रुपयांनी मिळत नाहीत. जो रुपयांनी मिळतो तो भगवंताचा भक्त नसतो. आपल्या दृष्टीने रुपयाचे महत्त्व आहे, महात्म्याच्या दृष्टीने नाही; त्यास रुपया दगडा सारखाच असतो. व्यक्ती रुपयांमुळे आनंदात मिरवत असते, खुषीत वावरत असते. जितके रुपये असतील त्याच्या प्रमाणात जे पाहिजे ते खरेदी करू शकते. परन्तु ईश्वर आणि महात्मा रुपयांनी मिळत नाहीत. ईश्वर आणि महात्मा यांना विकत घेण्यासाठी श्रद्धा आणि प्रेम पाहिजे. भगवंतावर दृढ विश्वास होईल तर सर्व काही मिळू शकते. भगवंताची वस्तु तर त्याच्या अंतर्गत येऊन जाते.

---

प्रवचन—दिनांक ११-४-१९३९, प्रात:कालं, गोविन्दभवन, कोलकाता।

सर्वात सरळ आणि सुगम उपाय ईश्वराचे आश्रित होणे हा आहे. ईश्वराचे आश्रित होण्यामुळे सहजच उद्धार होऊन जातो. सर्व जातीच्या लोकांचा उद्धार होऊ शकतो. भगवंताने एक सरळ मार्ग खुला केला आहे, शरणागतीचे एक मोठे क्षेत्र खुले केले आहे. भगवान म्हणतात—

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्॥**

(गीता ९। ३२)

हे अर्जुना! स्त्री, वैश्य, शूद्र तसेच पापयोनि-चाण्डाळादि जे कोणीही असतील ते ही मला शरण येऊन परमगतिला प्राप्त होतील.

अत्यंत सरळतापूर्वक ईश्वरावर भरवसा ठेवला पाहिजे. ईश्वरावर भरवसा ठेवल्याने असे बळ येते की व्यक्ती निर्भय बनून जाते. ज्याच्या ठिकाणी भय दिसते तो ईश्वरावर निर्भर नाही असे जाणावे. जो ईश्वराच्या भरवशावर राहातो त्याच्या बळाला सीमा राहात नाही. आम्हा लोकांना मदत करणारे भगवानच आहेत. त्या भगवंताचा आश्रय घेतल्यावर उत्साह, बल, प्रेम यावयास पाहिजे. कोणी एक माणूस जरी उत्साह दाखवीत असेल तर आम्ही त्याचे वर्णन करू शकत नाही. आम्ही सर्व लोकांनी परमेश्वराचा आश्रय घेऊन काम केले पाहिजे. भगवंताची प्रतिज्ञा आहे की जो माझा आश्रय घेतो त्याचा मी कधीही त्याग करीत नाही.

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसम्मूढचेताः।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥**

(गीता २। ७)

म्हणून कायरतारूपी दोषाने उपहत झालेल्या स्वभावाचा तसेच धर्माच्या विषयी मोहित चित्त झालेला मी आपल्याला विचारत आहे की जे साधन निश्चित कल्याणकारक असेल ते माझ्यासाठी आपण

सांगावे कारण मी आपला शिष्य आहे म्हणून आपणास शरण आलेल्या मला आपण उपदेश द्यावा.

भगवान आपणा सर्वांना आश्वासन देत आहेत, भरवसा देत आहेत आपल्या मस्तकावर हात ठेवीत आहेत. तो दूर सारून उपयोगी नाही. जर आमच्या मस्तकावर भगवंताचा हात आहे तर मग चिन्ता काय आहे ? राजा जनकाच्या सभेत लक्ष्मण म्हणत होते की हे मूढ जनका ! मी या धनुष्यास कमलाच्या देठा प्रमाणे तोडू शकतो— ***तोरौं छत्रक दंड जिमि तव प्रताप बल नाथ।*** केवळ भगवंताचा आश्रय आहे. त्या बळावर सर्व काही करू शकतात.

ज्याचा भगवंतावर भरोसा आहे त्याच्या साधनात कधी कमतरता येऊ शकत नाही. ज्या लोकांच्या साधनात ढिलाई येत आहे, संसारात मारे-मारे फिरत आहेत त्यांचा जर ईश्वरावर भरवसा होईल तर त्यांचा कायापालट होणे शक्य आहे. एखाद्या ठिकाणी युद्ध होत असेल, त्यांत कोणी एखाद्याने एका फार शक्तिसंपन्न व्यक्तीचा आश्रय घेतला तर तो निर्भय होऊन जातो. ज्या प्रमाणे सैन्याच्या बळावर देशाचा राजा निर्भय राहतो आणि राजामुळे प्रजा निर्भय राहात असते.

एखादा कुणी बलवान त्यालाही दबावाखाली आणू शकणारा असू शकतो पण परमेश्वराला, त्याच्या दासाला, त्याच्या दासानुदासाला जेरीस आणण्याची शक्ती कुणाच्याही ठिकाणी नाही. त्याचे काम क्रोधादि सर्व एक क्षणात नष्ट होऊन जातात.

जेव्हा एखादा सामान्य राजाही आम्हांला आश्रय देतो तेव्हा आम्ही निर्भय होऊन जातो तर मग परमात्मा तर अनन्त बलशाली आहे.

कमीत कमी जो पुरुष आपल्या आत्म्याचा आश्रय घेतो त्याचेही कार्य सिद्ध होऊ शकते. आपल्या साधनाचा भरवसाही असा जबरदस्त असतो की मायेच्या किल्ल्याला तोडून पुढे निघून जातो. मग परमेश्वराचा आश्रय घेणारा पार करून जाईल यात काय आश्चर्य आहे.

भगवान म्हणतात—

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥**

(गीता ७। १४)

कारण की ही अलौकिक अर्थात अति अद्‌भुत त्रिगुणमयी अशी माझी माया अति दुस्तर आहे, परन्तु जे पुरुष केवळ मलाच निरन्तर भजतात ते या मायेचे उल्लंघन करून जातात अर्थात संसार सागरांतून तरून जातात.

सत्त्व, रज, तम तीन्ही माझी माया आहे. जे कुठल्याही मार्गाला जाणणारे नाहीत ते पुरुषही जाणणाऱ्या महापुरुषांकडून श्रवण परायण होऊन संसार सागराच्या पार जातात. ज्याला परमात्म्याचा आश्रय आहे, त्याचा सामना भारीत भारी मायेची सेनाही करू शकत नाही. तुलसीदासजी म्हणतात—

**खल कामादि निकट नहिं जाहीं। बसइ भगति जाके उर माहीं॥**
**गरल सुधासम अरि हित होई। तेहि मनि बिनु सुख पाव न कोई॥**
**राम भगति मनि उर बस जाकें। दुख लवलेस न सपनेहुँ ताकें॥**

ज्याच्या हृदयात भगवंताचा भक्तीरूपी मणी वास करतो त्याच्या जवळ कामक्रोधादि मायेची सेना जाऊच शकत नाही. शत्रु मित्र होतात. भगवंताची शरणागती अशीच आहे.

भगवंताच्या दासानुदासाचा आश्रित होण्यानेही मनुष्याचा उद्धार होतो मग परमात्म्याचा आश्रय घेऊन उद्धार झाला तर त्यात विशेष ते काय? आमचे प्रभु आमच्या बरोबर राहून आपल्या भक्तावर कुठल्याही प्रकारची आपत्ती आली तर त्याचे रक्षण करतात. ज्यावेळी रावणाने विभीषणावर शक्ती सोडली तेव्हा तो वाचला नसता परन्तु भगवंतांनी ती शक्ती आपल्यावर घेतली. विभीषणाला रावणाने लाथ मारली तेव्हा तो रडत

भगवंतास शरण आला आणि म्हणाला मी रावणाचा भाऊ आहे. आपल्याला शरण आलो आहे. भगवान म्हणतात की माझ्या स्वभावात हा दोष आहे की कुणीही जर मला म्हणेल की मी तुमचा आहे तर मी त्याचा त्याग करू शकत नाही. हनुमंतास म्हणाले त्याला घेऊन या. रावणाची लाथ खाणारा निर्भय झाला तर मग काम क्रोध काय रावणाहून बलवान आहेत ? भगवंताकडून घोषणा होत आहे की चला इकडे निघून या! आम्हांला संधि मिळाली आहे. मुहूर्त शोधायला नको आहे; लगेच भर्ती व्हावयास हवे आहे.



# अमृत-कण

१. मनुष्याने कामाशिवाय राहु नये. झोपण्याचे सहा तास सोडून उरलेला वेळ परमार्थात जाईल तर परमार्थातच घालवला पाहिजे नाही तर काम तरी केले पाहिजे.

२. भोग, प्रमाद, आळस आणि पाप यात समय कधी घालवू नये.

३. भोजन करण्यापासून तो झोप घेण्यापर्यंतची सर्व कर्मे तुम्ही परमार्थाच्या रूपात बदलू शकता. जर बुद्धिचा उपयोग करून बदलण्याची इच्छा असेल तर हा सिद्धान्त मनात ठेवावा की संसारात माझे जगणे भगवंताकरिताच आहे. मी खाणे, पिणे आदि. कर्मेही भगवंतासाठीच करतो. भगवंतासाठीचे तात्पर्य भगवंताच्या प्रसन्नतेसाठी अथवा भगवंताच्या आज्ञेचे पालन करण्यासाठी करतो.

४. भगवंताची आज्ञा पाळण्यासाठी खाणे पिणे आदि आहे, शरीरासाठी नाही. शरीराचा नाश झाला तर होऊ दे काही हरकत नाही. पण भगवंताची आज्ञा आहे यासाठी शरीराचा निर्वाह करावयाचा आहे. भगवंताची प्रीति प्राप्त व्हावी म्हणून भगवंताच्या आज्ञेचे पालन करावयाचे आहे.

५. याहून चांगली गोष्ट ही आहे की भगवंताच्या आज्ञेचे पालन करणे मनुष्याचे कर्तव्य आहे. भगवंताच्या आज्ञेचे पालन करावयाचे ते कुठल्याही हेतूने नाही तर आज्ञेचे पालन करणे हीच मनुष्याची मनुष्यता आहे, पालन न करणे पशुता आहे नीचता आहे.

६. भगवंताची आठवणही ठेवत नाही, त्यांच्या आज्ञेचे पालनही करीत नाही यापेक्षां अधिक आपली नीचता काय असेल?

७. दुःख भोगतांना खूप हर्ष व्हावयास हवा की ही ईश्वराची माझ्यावर पूर्ण दया आहे. ज्याच्याविषयी आत्मीयता असते त्याला कडक शिक्षा केली जाते. ज्याला ईश्वर आपलेसे करतो त्याच्याशी असा व्यवहार करतो.

८. ईश्वर आपल्याला जितके अधिक कष्ट देईल तितके अधिक प्रसन्न झाले पाहिजे. जाणले पाहिजे की ईश्वराची माझ्यावर महान दया आहे.

९. ज्या वस्तूला आपण आपली समजत होतो त्या वस्तूला ईश्वराने आपली म्हटले ही ईश्वराची महान दया आहे.

१०. भगवंताची वस्तु मी माझी मानली होती आता ती भगवंताने परत घेतली आहे ही भगवंताची महान दया आहे.

११. आपले धन, घर आदि उत्तमात उत्तम कामांत उपयोगी यावे हा सकामभाव आहे. प्रभूचे रुपये प्रभूच्या कामात लागावे हाच भाव उत्तम आहे.

१२. ज्या कामाला कुणी ग्राहक नसेल तेच काम आपण स्वत: करावे.

१३.महात्मा आले आणि कुणी सामान्य अतिथि आला तर सर्वांची समान भावाने सेवा करावी, त्या क्षणी भगवंताची प्राप्ती होऊन जाईल.

१४. जो व्यवहार आपण परमेश्वराशी प्रेमाने करता तोच व्यवहार जर भंग्याशीही प्रेमाने कराल तर भगवान तात्काळ भेटतील.

१५. आपत्तीकाळात भंग्याची सेवा करणे म्हणजे परमेश्वराची सेवा करणे आहे, कर्तव्य आहे. त्यानंतर स्नान करावे.

१६. भगवंताच्या आज्ञेचे पालन केल्यावर आपण असे समजून प्रसन्न झाले पाहिजे की इतका समय भगवंताच्या कामासाठी उपयोगांत आला.

१७. ज्याला ज्या वस्तूची आवश्यकता असेल त्याला ती वस्तू देऊन असे प्रसन्न व्हावयास हवे की जसे भगवंतास देऊन प्रसन्न होतो.



# महापुरुषांचा महिमा आणि वैराग्याचे महत्त्व

जो आपली लोकांकडून पूजा करवितो त्याचा महापुरुषही तिरस्कार करतात. जो आपली पूजा करवितो तो कुष्ट रोगी आहे. त्याच्यापासून दूर राहावे. महापुरुषांचे दर्शन, स्पर्श तसेच भाषणाने कल्याणच कल्याण होत असते. भगवंताच्या दर्शनाने भक्तांना जसा आनन्द होतो त्याच प्रकारे महापुरुषांच्या दर्शनाने श्रद्धाळू व्यक्तीला आनन्द होतो. महापुरुषांचा परिचय हाच आहे की त्यांच्या दर्शन भाषण, स्पर्शाने आपल्यातही महापुरुषत्व यावे. त्यांची पक्की ओळख हीच आहे.

महापुरुषांच्या आज्ञेचे पालन, त्यांची सेवा अत्यंत मूल्यवान आहे. तेही गुप्तरूपाने केले तर अधिक मूल्यवान आहे. करणारा स्वत:च जाणतो दूसरा कुणी जाणत नाही गुप्त म्हणजे अथवा परमात्मा सर्वज्ञ आहे म्हणून तो जाणतो. दुसऱ्या माणसांना जाणवून देण्याची आवश्यकता नाही, तसे केल्याने त्याला कमीपणा येतो, त्याचे मूल्य कमी होते.

एखादा मनुष्य महात्म्याच्या आज्ञेस अनुसरून वागतो आहे लोक समजत आहेत की हा आपल्या मनाप्रमाणेच वागत आहे तर ते मूल्यवान आहे.

सेवा, पूजा, भजन, ध्यान, आज्ञापालन सर्व गुप्त रूपाने करावे. भगवंताचे तुलसी–चरणामृत गुप्त रूपाने घ्यावे, साऱ्या गोष्टी मानसिकच कराव्या.

आपल्या ठिकाणी काही चांगुलपणा असेल तर तो लपवून ठेवावा. थोडासाही वाईटपणा, दोष असेल तर तो उघड करावा. वाईटपणाच नसेल तर गप्प राहावे परन्तु आपल्या चांगुलपणाचे वर्णन करू नये.

---

प्रवचन—दिनांक २-७-१९४४।

जसे बोलतो तसेच वागावे. अशी माणसे या संसारात फार कमी आहेत. या प्रमाणे केले तर त्याचा प्रभाव जरूर पडतो.

दुसऱ्या माणसांनी जर आपल्या चांगुलपणाची प्रशंसा केली, वर्णन केले तर घाणी प्रमाणे समजून दूर फेकून द्यावे. त्याचा स्वीकार करू नये.

घाणीला घाणच समजावे. चांगल्या माणसांची संगत करावी, ते स्वतःच समजावून देतील. महात्मा म्हणवून घेऊ नये, परन्तु महात्मा बनणे जरूर आहे. आपल्याला जग चोर, बदमाश म्हणत असेल परन्तु आपण वास्तविक महात्मा असाल तर आपल्याला कोणी अडविणारा नाही.

भगवान श्रीकृष्णचन्द्रांची लीला पाहून गोपींची जशी स्थिति होत होती अशीच स्थिति महात्म्यांच्या क्रियेने तसेच दर्शनाने श्रद्धाळू माणसाची होऊ शकते. गौरांग महाप्रभूंचे जे अनुयायी होते, गौरांगांची प्रेमावस्था पाहून त्यांचीही स्थिती तशीच होऊन जात असे.

ईश्वराच्या आणि महात्म्यांच्या ठिकाणी गुप्त प्रेम अधिक मूल्यवान आहे. गुप्त प्रेमाचे माहात्म्य फार अधिक आहे त्यात दोष राहू शकत नाहीत. चरणांची सेवा करायची असेल तर मनाने करावी. बाहेरही काही सेवा घडली तर तिला प्रकाशित करू नये उलट लपवावे.

**प्रश्न**—सत्संगात ऐकलेल्या गोष्टी लक्षात राहात नाहीत.

**उत्तर**—त्याचे कारण श्रद्धा नाही हेच आहे. श्रद्धेची आवश्यकता आहे. श्रद्धेसाठी मूळ उपाय आहे भगवंताची प्रार्थना करणे. खाण्यामुळे अथवा भोगण्यामुळे ज्या वस्तुमध्ये प्रेम असते तिची चांगली आठवण राहाते. ज्याला आंब्याचे प्रेम असेल तो सांगेल की लंगडा चांगला आहे की मुंबईचा आंबा चांगला आहे. कुणा विरक्त पुरुषास विचारले तर त्याच्या दृष्टीने सर्व आंबे एकच आहेत. वास्तविक जर महत्त्वाचे काही असेल तर श्रद्धा-प्रेमच आहे. ज्यावेळी वैराग्य उत्पन्न होते

त्यावेळी पूर्वी आवडणारी वस्तु फिक्की वाटू लागते. आपल्याला ज्यावेळी वैराग्य उत्पन्न होईल तेव्हा अत्तर, लव्हेंडर मूत्रासारखे वाटू लागेल. जो मांस खात नसेल त्याला कसायाच्या दुकानाकडे जर कुणी नेऊ लागले अथवा तो स्वाभाविकच तिकडे गेला तर त्याला कळून येईल की आपण कुठे येऊन पोहोचलो आहोत ! त्या माणसासारखीच सांसारिक भोगांपासून विरक्त माणसाची दशा होते.

ईश्वराच्या कृपेने, नामजपाने, ध्यानाने स्वाध्यायाने, वैराग्याने साधन तीव्र होते. वैराग्यामुळे सर्व दोष पळून जातात. ज्या प्रमाणे लाख उपाय केले तरी सूर्यासमोर अन्धकार राहूच शकत नाही. त्याप्रमाणे जेथे वैराग्य असेल तेथे कुठलाही दोष टिकूच शकत नाही. एक वैराग्य असेल तर सारे गुण आपोआप येतात. ज्याच्या ठिकाणी वैराग्य असेल तो मान-बढाई, प्रतिष्ठा यापासून दूर पळून जाईल. मान, बढाई, प्रतिष्ठा, पूजा या मध्ये प्रीति-आवड हे तर ममतेचा बाप आहे.

साधु असो वा गृहस्थ असो, जेथे वैराग्य नसेल तेथे काहीच नाही जेथे वैराग्य असेल तेथे उपरति होईल. साधु आहे आणि कांचन कामिनीचा संसर्ग आहे तर तेथे उपरति कोठली ? मान, बढाई प्रतिष्ठा प्रिय असेल तर तेथे वैराग्य कोठले असणार ? त्याला तर दुरूनच नमस्कार करावा.



# प्रारब्ध भोगण्यानेच नष्ट होते

साधूच्या संगाने कुठल्याही प्रकारची हानी होत नाही. मग कुठल्याही प्रकारे भेट होवो. ईश्वर आणि महात्म्यांच्या द्वारा जी वस्तु पाहिली जाते, त्या जड पदार्थांत त्यांचे ईश्वराचे, महात्म्यांचे परमाणु प्रविष्ट होतात शिरतात.

ईश्वराने आपले जर स्मरण केले तर आपण कृतकृत्य झालो. तसेच एखाद्या महात्म्याने आपली आठवण केली तर ते आपल्यासाठी खूप लाभदायक आहे. ईश्वराच्या प्राप्ती इतका तर नाही तरी पण लाभ तर आहेच. ईश्वरा इतका का नाही? कारण त्यांचे मन, बुद्धि शरीर ईश्वराप्रमाणे दिव्य नाही. ईश्वराचे शरीर निरामय आहे. महात्म्याचे शरीर निरामय नाही. महात्मा पुरुषांची क्रियमाण तसेच संचीत कर्मे नष्ट होतात परन्तु प्रारब्ध तर भोगण्यानेच नष्ट होते. ज्याप्रकारे ही व्यक्ती आहे, तिने जितकी पापे केली असतील ती भजनाने नष्ट होऊ शकतात परन्तु प्रारब्ध भोगण्यानेच नष्ट होईल जसे एखाद्याने येथून बाण सोडला, तर तो कोठे जाऊन पडेल यावर सोडणाराचा काही वश चालत नाही. जे बाण भात्यामध्ये असतात त्यांच्यावर आपला अधिकार आहे. वाटल्यास उपयोग करा अथवा न करा. त्याचप्रमाणे हे शरीर भात्यातून सुटलेल्या बाणासारखे आहे. त्यांत आपल्या हातांतली गोष्ट काही नाही. बरीचशी पातके घडलेली असतात त्यांचा विनाश होऊ शकतो. भात्यात बरेचसे बाण पडलेले आहेत, त्यावर उपाय आहे, त्यांना काढून फेकून देता येणे शक्य आहे.



---

प्रवचन—दिनांक ३-७-१९४४, साहबगंज, गोरखपुर

# जशी भावना तसे फळ

आपल्यावर भगवंताची जितकी दया आहे तितकी फारच थोड्या लोकावर आहे. या जगात जितके लोक आहेत, त्यातील बऱ्याच लोकाना खोटेपणा, कपट करावे लागते. आपण तर येथे उदारतेने व्यवहार करण्याचा प्रस्ताव संमत करीत आहोत.

सरकारचे जितके कायदे आहेत, त्यापैकी एका गोष्टीसाठी आपल्याला सूट दिलेली आहे. लोक लाच देतात आपण फळे मिठाई आदि द्या. परन्तु कुठलेही बेकायदा काम तर करायचेच नाही. परिश्रम करा. काम बन्द पडले तरी चालेल पण कायद्याविरुद्ध काहीही काम करू नका.

कष्ट सहन करा. ती सहन करण्याचे फलच परमात्म्याची प्राप्ती आहे. सुगमतेचे फळ आहे नरकाची प्राप्ती.

कागद मिळाला नाही, बसून राहा. गहू मिळाला नाही, विकू नका बसून राहा. खर्च झाला, होऊदे. अडचणी सहन करणे हाच मुक्तिचा मार्ग आहे.

पाप प्रकाशित केले, उघड केले तर पापाचा क्षय होतो. पुण्य जर प्रकाशित केले-उघड केले तर पुण्याचा क्षय होऊन जातो. प्रचारात क्षय करण्याची शक्ती आहे. दोन नीति आहेत—

एक तर नाव कमविणे, संसारात खूप प्रचार करणे. यामुळे काय लाभ होतो ? ख्याति झाल्याने सर्वांच्यावर प्रभाव पडतो. एक नीति आहे की आपली बढाई करणे म्हणजे नग्न होऊन नाचणे आहे.

**प्रश्न**—दिसून तर असे येते की आपला प्रचार केला नाही तर प्रसिद्धी होत नाही.

**उत्तर**—आपल्याला नाव कमवायचे नाही. नामरूप तर खोटी

---

प्रवचन—दिनांक ४-७-१९४४, गोरखपुर।

गोष्ट आहे. आपल्याला तर खरी गोष्ट कमवायची आहे. खरी वस्तू आहे भगवान. मान बढाई इत्यादिची व्याख्यानात तर निन्दा केली, आता अंत:करणापासून निन्दा करणे आवश्यक आहे. म्हणजे आपण त्याप्रमाणे वागणे आवश्यक आहे. निराश होऊ नये की आम्ही हे करूच शकणार नाही. तुम्हा लोकांच्या निराशेमुळे आम्ही घाबरतो आहोत.

**प्रश्न**—बढाई करणे वाकडे काम आहे.

**उत्तर**—तिरके काम समजू नका. बरेच दिवसपर्यंत मानत होता निदान आता तरी मानू नका. तिरके असेल त्याला सरळ करा. आपणा सर्वांच्यातच हा दोष आहे येथून पुढे सुधारणा करा. आपण जे काम करतो त्याची प्रशंसा होत असेल तर ती लपवून ठेवली पाहिजे. आपल्या संस्थेच्या बढाईपासून आपला बचाव केला पाहिजे. लोक तर बढाई करतात आणि करवितात, आपण लपविली पाहिजे. आपल्या पत्रिकेचे नाव कल्याण, कल्याण कल्पतरु आहे. नाव मोठे आहे गुण नाहीत, नाम छोटे असावे, गुण मोठे असणे आवश्यक आहे.

आमच्या मनात तर अनेक गोष्टी येत आहेत. उत्तुंग मार्गाने चालण्याची गोष्ट मनात येत आहे. आपण सर्वलोकांनी मदत सहायता करावी. निष्कामाला निष्काम सिद्ध करणे हा सकाम भाव आहे. आपल्या कामाची प्रशंसा करणे म्हणजे मळ लावणे आहे.

साधन हे प्रारब्धाचे फळ नाही तर उलट ते कर्तव्य आहे. ही भावी वस्तु नाही, केल्याने होऊ शकते; म्हणून ते केलेच पाहिजे. परन्तु असे जरी असले तरी प्रयत्नांच्या सफलतेमध्ये ईश्वराची कृपा मानली पाहिजे. कर्त्याने स्वत:ला निमित्तमात्र मानले पाहिजे, त्यामुळे मग यात अभिमान येऊ शकत नाही. कार्याची सफलता ईश्वराच्या हातात आहे.

यामुळे हा निर्णय झाला की साधन वाढू शकते. ईश्वराच्या कृपेने वाढते की प्रयत्नाने? यात मानलेच पाहिजे की प्रयत्न निमित्तमात्र असतात वाढते ते ईश्वराच्या कृपेनेच!

साधनाला पवित्र बनविण्यासाठी ही एक गोष्ट उपयुक्त आहे. आणि वास्तविक हीच गोष्ट खरी आहे. गंगेची कृपा सर्वांच्यावर आहे. स्नान करणाराला लाभ होतो, जो स्नान करीत नाही तो फायदा करून घेऊ शकत नाही. लाभ होतो मात्र गंगेच्याच कृपेने! लाभ प्रयत्नांनी मिळतो; आणि प्रयत्नाची सफलता ईश्वराच्या हातात आहे. म्हणूनच ईश्वराची कृपा मानलीच पाहिजे.

इन्द्रियांचा संयम करणे हे आपले कर्त्तव्य आहे. जितका भोग आपोआप प्राप्त झाला आहे तो भोगण्यात किती स्वतन्त्रता आहे, यात कुठली मान्यता गृहीत धरली पाहिजे काय? संयम केला पाहिजे संयमानेच सफलता मिळते. सफलतेमध्ये ईश्वराचा हात असतो. आपण संयम केला नाही तर ईश्वराची कृपा काम करेल की नाही?

प्रचारकाचे पद अत्यन्त उच्च दर्जाचे आहे. त्यात लाभ आणि धोका दोन्हीही खूपच आहे. प्रचार ज्यादा झाला तर त्यात ईश्वराची दया समजावी. अभिमान येऊ देऊ नये. आपण निमित्तमात्र बनावे, प्रचाराचे श्रेय ईश्वराच्या कृपेला दिले तर प्रचार अधिक होऊ शकतो ईश्वराच्या कृपेवर भरवसा ठेवावा.

जो स्वतः प्रचारक बनून प्रयत्न करतो, त्याच्याद्वारा प्रचार कमीही होऊ शकतो. वास्तवात परमात्मा तर स्वयं प्रचार करतात, आपणच प्रचारक झाल्यामुळे म्हणजे कर्तेपणाचा भाव आल्यामुळे प्रचार होत नाही. कुठलेही कार्य असो त्याची प्रतिक्रिया होतच असते. तो म्हणेल की मी प्रचार केला. भगवान म्हणतात की नाही. जर तो असे समजेल की मी निमित्तमात्र

आहे, भगवंताच्या कृपेने कार्य होत असेल तर प्रचार अधिक होईल.

औषध घेणे कर्तव्य आहे परन्तु घेतले नाही तर पाप नाही आणि लाभही नाही. परन्तु संयम केला नाही तर हानी आहे आणि पापही आहे कारण मनुष्य या नात्याने जे कर्तव्य आहे ते तो करीत नाही. मनुष्य जगण्याची इच्छा करील तरी तो जगू शकत नाही, मरण्याची इच्छा करील तर मरूही शकत नाही. वास्तविक मृत्यु ज्यावेळी होणार असेल तेव्हाच होतो. सामान्य गोष्ट हीच आहे परन्तु विशेष गोष्ट अशी आहे की आयुष्य कमी-अधिक होऊ शकते. भगवंताची भक्ती करण्याने अथवा अनुष्ठान करण्याने आयुष्य वाढू शकते पण या प्रकारची घटना लाखो माणसांत कुणा एखाद्या माणसासम्बन्धीच घडत असते.मृत्युचे निमित्त बदलू शकते परन्तु आयुष्य नाही. आपला मृत्यु कशाप्रकारे होईल ही गोष्ट निश्चित सांगितली गेलेली नाही.

प्रचारकात दम्भ असेल तर फारच अधिक हानी आहे, अधिक धोका आहे. जितका दम्भ असेल तितकी हानी होईल. मान, बढाईची इच्छा, रुपये आणि शरीरास आराम—स्वार्थ या तिन्ही गोष्टी नसतील तर खूपच जास्त लाभ होईल. प्रचाराने तर लाभ आहेच. प्रचार करतांना होणाऱ्या दोषांच्यामुळे हानी होते; पण ती पासून दूर राहून प्रचार करावयास पाहिजे.

गीतेचा पाठ करीत आहे, माळेवर जप करीत आहे, गीतेच्या पाठाने अथवा जपमाळा ओढण्याने हानी होत नाही, हानी होत असते दम्भ करण्याने! मी वैश्य आहे, शरीरास आराम मिळावा म्हणून रुपयांसाठी अथवा आपली पूजा व्हावी म्हणून व्याख्यान दिले तर पूर्णतः बुडून जाण्यासारखे आहे. कारण की ही ब्राह्मणाची वृत्ति आहे. दम्भासाठी करीन तर आणखी जास्तच धोका आहे. मान बढाईसाठी केले तरी थोडा धोका आहेच.

ब्राह्मणही जर रुपयाला प्राधान्य देऊन, द्रव्यांची इच्छा धरून व्याख्यान वगैरे देईल तर त्यालाही धोका आहेच. सेवा हीच प्रधान आहे असे त्याने मानले तरी थोडा धोका आहेच. जो रुपये आणि सेवा यांना फेकून देतो, त्यांची पर्वा करीत नाही, त्याला मात्र धोका नाही. बाध्य होऊन कधी कधी स्वीकार करावा लागतो अशा प्रकारच्या त्यागात वैश्यालाही धोका नाही. आणि ब्राह्मणाला तर नाहीच नाही.

माझी जर अशी नियत असेल की ब्राह्मणाची जीविका नष्ट व्हावी तर मग मला धोका आहे. जितकी म्हणून हानी आहे ती सर्व स्वार्थामुळेच होत असते.

माझी आई आहे, पूज्य आहे, तिला नित्य प्रणाम केला पाहिजे. जन्माच्या वेळी प्रथम माझे पाय बाहेर आले होते. म्हणजे मी पायाळू आहे. आईला उसण भरली, उसण ठीक व्हावी म्हणून मी तिच्या छातीला पाय लावतो, तर मग हे काय पाप आहे? पाप असूनही त्याला पुण्य म्हटले जाईल.

भक्तिच्या सिद्धान्ताप्रमाणे आणि ज्ञानाच्या सिद्धांता प्रमाणे जे काही आहे ते सर्व भगवंताचे स्वरूप आहे. हीच उच्च अत्यंत उच्च श्रेष्ठ अशी भावना आहे. ही उच्च, उच्चतम साधना आहे. सर्व पदार्थात अशी उच्चतम भावना केली जाऊ शकते. आणि नीचाहून नीच भावनाही केली जाऊ शकते. त्याचा परिणाम भावनेवर, अवलंबून आहे.

**जिन्ह कें रही भावना जैसी। प्रभु मूरति तिन्ह देखी तैसी॥**

संसार भावनामय आहे. मनुष्याचे स्वरूपही भावनामय आहे. लाभही भावनेला अनुसरूनच होत असतो.

उच्चतम ईश्वर भावना आहे, दोन नंबरची भावना साधु भावना आहे. पापमय भावना नीचाहून नीच भावना आहे.

हवा तेवढा लाभ करून घ्या, त्याला सीमा नाही. आपण विचाराल की मुक्तीहूनही ज्यादा लाभ मिळू शकतो कां? तर उत्तर आहे कीं हाँ, मिळू शकतो. जोपर्यंत या संसारात एक का होईना जीव आहे तोपर्यंत लाभ करून घेणे शक्य आहे. आपल्या आत्म्याची उन्नती करून घेणे हा उन्नतीचा शेवट होत नाही. पतनाचा अन्त नाही, अथवा उन्नतीचाही अन्त नाही. ज्यावेळी सर्वांचे कल्याण होऊन जाईल त्यावेळी उन्नतीचा अन्त झाला असे म्हणता येईल.

ईश्वरबुद्धीहून अधिक उच्च बुद्धि होऊ शकत नाही. ईश्वरबुद्धी जडामध्ये करावी की चेतनात करावी? सर्वांमध्ये करा. त्यात काही कधी हानी होऊ शकते कां? हानी होऊ शकत नाही ही सत्य गोष्ट आहे. ईश धातुचा विचार केला तर ज्ञानाच्या सिद्धान्तानुसार सर्व जग ईश्वराचे स्वरूप आहे. भक्तीच्या स्वरूपानुसारही सर्व ईश्वराचे स्वरूप आहे. चांगल्या भावनेचे फळ वाईट असूच शकत नाही म्हणून चांगली भावनाच केली पाहिजे.

नामदेवाने कुत्र्याच्या ठिकाणी भगवंताची भावना केली तर काहीही वाईट फळ मिळाले नाही. भोगबुद्धि पतन करणारी आहे ईश्वरबुद्धी नव्हे. प्रल्हादाने खांबामध्ये भगवंताची भावना केली तर भगवान प्रकट झाले. हे भावनेचे फळ आहे.

परमात्म्याची प्राप्ती करवून देण्याची शक्ति आपल्यामध्ये नसूनही जर कधीं परमात्म्याची प्राप्ती करविण्यास भगवंतानी आपल्याला निमित्त बनविले तर नाही म्हणू नये. भगवान म्हणतात—

**निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्॥**

(गीता ११।३३)

या प्रकारेच जर एखादी व्यक्ती मी दुसऱ्याचे कल्याण करू

शकेन अशी शक्ती आपल्याठिकाणी नाही असे समजत असली तरी तो भलेही करू शकेल. परन्तु जो असा अभिमान बाळगतो की मी दुसऱ्याला परमात्म्याची प्राप्ती करून देऊ शकतो, तर तो मात्र करून देऊ शकत नाही. जो असे समजतो की मी करवू शकत नाही, तर दुसरा मनुष्य त्याच्यावर आरोप करतो की हा करवू शकतो आहे. याप्रकारे जर कोणी त्याला निमित्तमात्र बनविले तर बनवू देत. एकतर निमित्तमात्र होण्याची ही गोष्ट आहे. भगवान जर आपल्याला निमित्त बनवत असतील की दुसऱ्यांना माझी प्राप्ती व्हावी म्हणून मी तुला निमित्त बनवीत आहे तर मना करू नका. नाही म्हणू नका.

दुसरी गोष्ट अशी आहे की भगवंतानी आम्हांला निमित्त नाही बनविले तरी या कामात स्वतः निमित्त बनून जावे आणि मानावे की भगवंतानी निमित्त बनविले आहे. भगवान जर म्हणाले की मी तर तुला ही पदवी दिलेली नाही तर उत्तर द्यावे की मी बळेच ओढून घेतली आहे.

जसे कोणी मनुष्य मरणार आहे आणि तो आम्हांला निमित्त बनवून, भजन, नाम ऐकण्याची इच्छा करीत आहे; अथवा त्याने जरी बोलावले नाही तरी आपणच स्वतः जाऊन त्याला कीर्तन भजन, गीता ऐकवावी तर, तो म्हणेल ऐकवा, या जागी स्वतः आपणच निमित्त बनावे. याप्रकारे एखाद्या ठिकाणी प्रयत्न केला त्यामुळे एका मनुष्याची जरी मुक्ती झाली तरी आपले जीवन सफळ होते. मनुष्याचे जीवन कल्याण करण्यासाठीच मिळालेले आहे. आपण आपले कल्याण करू शकलो नाही तरी दुसऱ्याचे तर कल्याण केले ना, त्यामुळे असे समजू नये की आपले तर कल्याण झालेच नाही.

कोणीही जर म्हणाले की तुमच्या ठिकाणी शक्ती आहे तर या

म्हणण्याचा स्वीकार करू नका. कुणी विचारले की आपण ईश्वराची प्राप्ती करून देऊ शकता का? तर सांगावे की नाही. माझे इतके सामर्थ्य नाही. ईश्वराच्या कृपेनेच त्याची प्राप्ती होऊ शकते.

परमात्म्याची प्राप्ती होण्यास मी कशा प्रकारे पात्र होऊ शकेन? या प्रश्नाचे उत्तर असे की परमात्म्याला शरण जा. हा सल्ला देणे हें निमित्त बनणे झाले. आपली शक्ती मानून निमित्त बनू नका.

तरीही जर तो म्हणेल की आपणच परमात्म्याची प्राप्ती करवून द्या. तर त्याला खुशाल बडबडत राहू दे तुम्ही त्याच्याकडे लक्ष्य देऊ नका. एखादा शिवी देतो, दुसरा कुणी एखादा प्रशंसा करतो, दोघांचेही ऐकू नका.



# भवरोगाची औषधी—भगवद भजन

आपल्या लोकांचे जे प्रेम आहे त्याचे मूल्य तर मी चुकते करूच शकत नाही; मी लज्जित होत असतो. आपण रोगाची गोष्ट विचारली त्यावरून एक गोष्ट आठवली आहे एक रोगी वैद्याजवळ गेला, वैद्याने सांगितले की कुपथ्याचा त्याग कर, पथ्य पाळ आणि औषधाचे सेवन कर. ही गोष्ट ऐकल्यावर रोगी म्हणाला की ठीक आहे, मी विचार करून सांगतो. दुसऱ्या वैद्याजवळ गेला. निदान करविले. दुसऱ्याने सांगितले की कुपथ्याचा त्याग करून पथ्य पालन करावे लागेल; औषधाची आवश्यकता नाही. तिसऱ्या जवळ गेला, त्या वैद्याने सांगितले की औषधाचे सेवन करावे लागेल. पथ्य–कुपथ्याची काही आवश्यकता नाही औषधाने सर्व कामे आपोआप होऊन जातील. त्याने विचार केला की हे ठीक आहे. औषधाचे सेवन केले. आराम पडला. हा दृष्टान्त आहे.

महात्मा वैद्य आहेत, आम्ही सर्व रोगी आहोत, जन्मणे मरणे हा रोग आहे. योगी, ज्ञानी आणि भक्त हे तीन वैद्य आहेत. एकाने सांगितले औषध आणि पथ्य सेवन आणि कुपथ्याच्या त्याग, तो योगी होता त्याने सांगितले की पथ्याने राहावे लागेल, योगाचे साधन करावे लागेल, दुर्गुण, दुराचारांचा त्याग करावा लागेल. पथ्य यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधि या आठांचे सेवन करावे लागेल. कुपथ्याचा त्याग करावा लागेल. रोग्याने विचार केला की हे माझ्या कामाचे नाही कारण हे कठीण आहे. ऐकून निघून गेला. दुसऱ्याजवळ गेला तो ज्ञानी होता त्याने सांगितले कुपथ्याचा त्याग आणि पथ्याचे सेवन करावे. संसार नाशवान आहे, स्वप्नवत आहे, वास्तव नाही, हे कुपथ्य आहे याचा त्याग कर सत्य पथ्य आहे. सच्चिदानन्दाचा भाव बस ऐवढेच करायला हवे. रोग्याने विचार केला हे कठीण आहे. तीसरा भक्त होता त्याने सांगितले

औषध सेवन करावे लागेल. एक औषध आहे. त्याच्या सेवनाने जे काही कुपथ्य झालेले आहे ते सर्व नष्ट होऊन जाईल त्याच्यात इतका गुण आहे की दुर्गुण, दुराचार, दुःख, पाप सर्वांचा नाश होऊन जाईल. हे काम ठीक आहे. हे भगवंताचे भजन आहे.

भगवान म्हणतात—

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति॥**

(गीता ९।३०-३१)

कोणी अतिशय पापाचारी, दुराचारी, व्यभिचारी आहे मला अनन्यभावाने भजतो आहे, माझ्या नामाचे आणि रूपाचे स्मरण करीत आहे. मला शरण आलेला आहे. त्याला साधूच मानले पाहिजे. भजनाच्या प्रतापाने तो लवकरच धर्मात्मा बनून जाईल विलम्ब होणार नाही. मी सत्य सांगतो की माझ्या भक्ताचा नाश होत नाही. सर्वांत श्रेष्ठ भगवंताची भक्ति आहे, भजन साधन आहे. ही औषधाची गोष्ट सांगितली.

अनेक लोक विचारतात की संसारात बुद्धिमान कोण आहे? शास्त्रांनी हे सिद्ध झालेले आहे की या संसारांत जन्मास येऊन जो मनुष्य उत्तरोत्तर आपली उन्नती करतो तोच पुरुष बुद्धिमान आहे. जो शरीर प्राप्त झाले असता जन्म-मरणापासून मुक्ती मिळवतो तोच बुद्धिमान आहे.तो परम आनन्दाला प्राप्त करतो. आपल्याला मुक्त करुन घेतो. आता हा विचार केला पाहिजे की मुक्त करणे म्हणजे काय आहे? सर्व सुख, आनन्द उन्नतिची इच्छा करतात, त्यासाठी प्रयत्न करतात आणि तरीही दुःख का प्राप्त होते? यात हेतु मूर्खता, दुःख आणि अज्ञान हीच आहेत—

॥ श्रीहरिः ॥

# गीताप्रेस, गोरखपुरसे प्रकाशित

## कुछ मराठी साहित्य

1314 **श्रीरामचरितमानस** सटीक (मोटा टाइप)
784 **ज्ञानेश्वरी गूढार्थ-दीपिका**
853 **एकनाथी भागवत**—मूल
7 **गीता-साधक-संजीवनी टीका**
1304 **गीता-तत्त्व-विवेचनी**
1071 **श्रीनामदेवांची गाथा**
1808 **श्रीतुकाराम महाराजांची गाथा**
859 **ज्ञानेश्वरी**—मूल, मझला
15 **गीता-माहात्म्यसहित**
504 **गीता-दर्पण**
748 **ज्ञानेश्वरी**—मूल, गुटका
14 **गीता-पदच्छेद**
1388 **गीताश्लोकार्थसहित**—मोटा टाइप
1257 **गीताश्लोकार्थसहित**—(पॉकेट साइज)
853 **एकानाथी भागवत-मूल**
1508 **अध्यात्मरामायण**
1678 **श्रीमद्भागवतमहापुराण**—खण्ड-१
1735 **श्रीमद्भागवतमहापुराण**—खण्ड-२
1776 **श्रीमद्भागवतमहापुराण**-केवल मराठी अनुवाद
857 **अष्टविनायक** (चित्रकथा)
1810 **कन्हैया** ( ” )
1811 **गोपाल** ( ” )
1812 **मोहन** ( ” )
1813 **श्रीकृष्ण** ( ” )
1718 **जीवनादर्श श्रीराम**
391 **गीता-माधुर्य**
1099 **अमूल्य समयका सदुपयोग**
1335 **रामायणके कुछ आदर्श पात्र**
1386 **महाभारतके कुछ आदर्श पात्र**
1340 **अमृत-बिन्दु**
1382 **शिक्षाप्रद ग्यारह कहानियाँ**
1210 **जित देखूँ तित तू**
1330 **मेरा अनुभव**
1073 **भक्त चन्द्रिका**
1383 **भक्तराज हनुमान्**

| | |
|---|---|
| 886 | साधकोंके प्रति |
| 885 | तात्त्विक प्रवचन |
| 1607 | रुक्मिणी स्वयंवर |
| 1744 | सकल संतवाणी (भाग-१) |
| 1745 | सकल संतवाणी (भाग-२) |
| 1640 | सार्थ मनाचे श्लोक |
| 1682 | सार्थ सं० देवीपाठ |
| 1732 | शिवलीलामृत |
| 1333 | भगवान् श्रीकृष्ण |
| 1332 | दत्तात्रेय-वज्रकवच |
| 855 | हरीपाठ |
| 1169 | चोखी कहानियाँ |
| 1385 | नल-दमयंती |
| 1384 | सती-सावित्री-कथा |
| 1671 | महाराष्ट्रातील निबडक संतांची चरित्रे |
| 1781 | श्रीदासबोध गद्यरूपान्तरासह |
| 1780 | श्रीदासबोध—मझला |
| 1817 | पाण्डव-प्रताप |
| 1276 | आदर्श नारी सुशीला |
| 1334 | भगवान्के रहनेके पाँच स्थान |
| 899 | देशकी वर्तमान दशा तथा उसका परिणाम |
| 1341 | सहज साधना |
| 1339 | कल्याणके तीन सुगम मार्ग और सत्यकी शरणसे मुक्ति |
| 802 | गर्भपात उचित या अनुचित फैसला आपका |
| 882 | मातृशक्तिका घोर अपमान |
| 883 | मूर्तिपूजा |
| 884 | सन्तानका कर्तव्य |
| 1279 | सत्संगकी कुछ सार बातें |
| 901 | नाम-जपकी महिमा |
| 900 | दुर्गतिसे बचो |
| 1428 | आवश्यक शिक्षा एवं आहार-शुद्धि |
| 1170 | हमारा कर्तव्य |
| 881 | भगवत्प्राप्तिकी सुगमता |
| 898 | भगवन्नाम |
| 1788 | श्रीशिवलीलामृतांतील अकरावा अध्याय |
| 1683 | सार्थ ज्ञानदेवी गीता |
| 1746 | मनोबोध भक्तिसूत्र |
| 1836 | श्रीगुरुचरित्र |
| 1814 | सामाजिक संस्कार कथा |
| 1815 | घराघरातील संस्कार कथा |